॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथाष्टमोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंतांनी सातव्या अध्यायाच्या शेवटी आपल्या समग्ररूपाचे वर्णन करत असताना ब्रह्म, आध्यात्म, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ या सहा शब्दांचा प्रयोग केला आणि या समग्ररूपाला जाणणाऱ्या योग्यांना अंतकाळी आपली प्राप्ती सांगितली. हे ऐकून या सहा शब्दांना स्पष्टरूपाने समजून घेण्यासाठी अर्जुन आठव्या अध्यायाच्या आरंभीच्याच श्लोकात एकंदर सात प्रश्न करतात.*

*अर्जुन उवाच*

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते॥ १॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः॥ २॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुरुषोत्तम** | = हे पुरुषोत्तम! | **प्रोक्तम्** | = म्हटले गेले आहे? | **देहे** | = देहात |
| **तत्** | = ते | **च** | = आणि | **कथम्** | = कसा आहे? |
| **ब्रह्म** | = ब्रह्म | **अधिदैवम्** | = आधिदैव | **मधुसूदन** | = हे मधुसूदन! |
| **किम्** | = काय आहे? | **किम्** | = कोणाला | **नियतात्मभिः** | = वशीभूत अंतःकरणाच्या मनुष्याकडून |
| **अध्यात्मम्** | = आध्यात्म | **उच्यते** | = म्हणतात? | | |
| **किम्** | = काय आहे? | **अत्र** | = येथे | | |
| **कर्मः** | = कर्म | **अधियज्ञः** | = आधियज्ञ | **प्रयाणकाले** | = अंतकाळी (आपण) |
| **किम्** | = काय आहे? | **कः** | = कोण आहे? | | |
| **अधिभूतम्** | = आधिभूत | **च** | = आणि (तो) | **कथम्** | = कसे |
| **किम्** | = कोणाला | **अस्मिन्** | = या | **ज्ञेयः असि** | = जाणले जाता? |

*व्याख्या*— **पुरुषोत्तम किं तद्ब्रह्म**— हे पुरुषोत्तम! ते ब्रह्म काय आहे अर्थात् "ब्रह्म" शब्दाने काय समजून घ्यावे?

**किमध्यात्मम्**—"आध्यात्म" शब्दाविषयी आपला काय अभिप्राय आहे?

**किं कर्म**—कर्म काय आहे अर्थात् "कर्म" शब्दाविषयी आपला काय भाव आहे?

**अधिभूतं च किं प्रोक्तम्**—आपण जो "आधिभूत" शब्द म्हटला आहे त्याचे काय तात्पर्य आहे?

**अधिदैवंकिमुच्यते**—"आधिदैव"कशाला म्हटले जाते?

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्**—या प्रकरणात "अधियज्ञ" शब्दाने काय समजावे. तो अधियज्ञ या देहात कसा आहे?

**मधुसूदन प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः**—हे मधुसूदन! ज्या पुरुषांचे अंतःकरण वश झालेले आहे अर्थात् जे संसाराचा त्याग करून अनन्यभावाने केवळ आपल्या ठिकाणीच रत झालेले आहेत, त्यांच्याद्वारा अंतकाळी आपण कसे जाणले जाता? अर्थात् ते आपल्या कोणत्या रूपाला जाणतात आणि कशा प्रकारे जाणतात. ?

*संबंध—आता भगवान् पुढील दोन श्लोकांत अर्जुनाच्या सहा प्रश्नांची क्रमाने उत्तरे देतात.*

*श्रीभगवानुवाच*

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसञ्ज्ञितः ॥ ३ ॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परमम्** | = परम | | (जीवाला) | | सत्ता प्रगट |
| **अक्षरम्** | = अक्षर | **अध्यात्मम्** | = आध्यात्म | | करणारा |
| **ब्रह्म** | = ब्रह्म आहे (आणि) | **उच्यते** | = म्हणतात | **विसर्गः** | = त्याग (हे) |
| **स्वभावः** | = परा-प्रकृतीला | **भूतभावोद्भवकरः** | = प्राण्यांची | **कर्म सञ्ज्ञितः** | = कर्म म्हटले जाते. |

***व्याख्या*— अक्षरं ब्रह्म परमम्—**परम अक्षराचे नाव ब्रह्म आहे. जरी गीतेत ''ब्रह्म'' शब्द प्रणव, वेद, प्रकृती इत्यादीचा वाचकही आला आहे तरीपण येथे ''ब्रह्म'' शब्दाबरोबर ''परम'' आणि ''अक्षर'' विशेषण दिल्याने हा शब्द सर्वोपरी, सच्चिदानंदघन, अविनाशी, निर्गुण-निराकार परमात्म्याचा वाचक आहे.

**स्वभावोऽध्यात्ममुच्यते—**तसे पाहिले तर आत्म्याच्या अनुरोधाने जे वर्णन केले जाते, ते देखील अध्यात्म आहे. अध्यात्ममार्गाचे ज्यात वर्णन असते तो मार्गही अध्यात्म आहे आणि या आत्म्याची जी विद्या आहे. त्याचे नावही अध्यात्म आहे. (१०।३२) परंतु येथे ''स्वभाव'' विशेषणासह ''आध्यात्म'' शब्द आत्म्याचा अर्थात् जीवाच्या अस्तित्वाचा (स्वरूपाचा) वाचक आहे.

**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसञ्ज्ञितः—**स्थावर जंगम जितके काही प्राणी पाहण्यात येतात, त्यांचा जो भाव अर्थात् अस्तित्व आहे. त्या अस्तित्वाला प्रगट करण्यासाठी जो विसर्ग अर्थात् त्याग आहे, त्याला ''कर्म'' म्हणतात.

महाप्रलयाच्या वेळी प्रकृतीची अक्रिय अवस्था मानली जाते आणि महासर्गाचे वेळी प्रकृतीची सक्रिय अवस्था मानली जाते. या सक्रिय अवस्थेचे कारण भगवंताचा संकल्प आहे की ''मी एकानेच पुष्कळ रूपाने व्हावे'' या संकल्पाने सृष्टीची रचना होत असते. तात्पर्य, महाप्रलयाच्या समयी अहंकार आणि संचित कर्मासहित प्राणी प्रकृतीत लीन होतात आणि त्या प्राण्यांसहित प्रकृती एका तऱ्हेने परमात्म्यात लीन होते. त्या लीन झालेल्या प्रकृतीला विशेष क्रियाशील करण्यासाठी भगवंताचा पूर्वोक्त संकल्पच कर्मांचा आरंभ आहे. ज्यापासून प्राण्यांची कर्मपरंपरा चालू होते. कारण महाप्रलयात प्राण्यांची कर्म होत नाहीत. तर प्राण्यांची त्यावेळी सुषुप्ती अवस्था असते. महासर्गाच्या आरंभापासून कर्म सुरू होतात.

चौदाव्या अध्यायात परमात्म्याच्या मूळ प्रकृतीचे नाव ''महद्ब्रह्म'' आले आहे. त्या प्रकृतीत लीन झालेल्या जीवांचा प्रकृतीशी विशेष संबंध करून देणे अर्थात् जीवांचे आपापल्या कर्मांचे फलस्वरूप शरीराशी संबंध करून देणेच परमात्म्याद्वारा प्रकृतीत गर्भ स्थापन करणे आहे. (१४।३-४) त्यातही वेगवेगळ्या योनीत निरनिराळी जितकी शरीरे उत्पन्न होतात, त्या शरीराच्या उत्पत्तीत प्रकृती कारण असते आणि त्यात जीवरूपाने भगवंताचा अंश असतो. **''ममैवांशो जीवलोके''**. (१५।७) अशा प्रकारे प्रकृती आणि पुरुषाच्या अंशाने संपूर्ण प्राणी उत्पन्न होतात.

तेराव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, स्थावर-जंगम जितके काही प्राणी उत्पन्न होतात, ते सर्व क्षेत्र (प्रकृती) आणि क्षेत्रज्ञ (पुरुष) यांच्या संयोगानेच होतात. क्षेत्र-क्षेत्रज्ञाचा विशेष संयोग अर्थात् स्थूलशरीर धारण करविण्यासाठी भगवंताचा संकल्परूपी विशेष संबंधच स्थावर-जंगम प्राण्यांचे स्थूलशरीर उत्पन्न करण्याचे कारण आहे. त्या संकल्प होण्यात भगवंताचा कसलाच अभिमान नसतो . तर जीवाचे अनंत जन्माचे जे कर्म संस्कार आहेत, ते महाप्रलयाच्या वेळी परिपक्व होऊन

जेव्हा फल देण्यासाठी उन्मुख होतात. तेव्हा भगवंताचा संकल्प होत असतो. *अशा प्रकारे जीवांच्या कर्माच्या प्रेरणेने भगवंतामध्ये ''मी एकानेच पुष्कळ रूपाने व्हावे.'' हा संकल्प होतो.

मनुष्यमात्राकडून विहित आणि निषिद्ध जितक्या क्रिया होतात त्या सर्व क्रियांचे नाव ''कर्म'' आहे. तात्पर्य मुख्य कर्म तर भगवंताचा संकल्प झाला आणि त्यानंतर कर्मपरंपरा चालत राहते.

**परिशिष्ट भाव—**'परा प्रकृती' भगवंताचा स्वभाव आहे—**'प्रकृतिं विद्धि मे पराम्'** (गीता ७।५) प्रकृती म्हणा अथवा स्वभाव म्हणा, एकच गोष्ट आहे. ही परा-प्रकृती अर्थात् जीवच 'आध्यात्म' नावाने म्हटला गेला आहे. याला भगवंताने आपला अंश देखील म्हटले आहे—**'ममैवांशो जीवलोके'** (गीता १५।७).

**'स्वभावोऽध्यात्म मुच्यते'** चे दुसरे तात्पर्य हे आहे की, बाल्यावस्था, तारुण्य, वृद्धावस्था, जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती, चौऱ्यांशी-लक्षयोनी, सर्ग आणि प्रलय, महासर्ग आणि महाप्रलय या सर्वांमध्येही जीवाचा कधी अभाव नसतो—**'नाभावो विद्यते सतः'** (गीता २।१६) अर्थात् याचा स्वतःचा भाव (सत्ता अथवा असणेपणा) सदा विद्यमान राहतो.

सृष्टि-रचनारूपी कर्माला 'त्याग' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, त्याच्या स्वतःच्या स्थिरतेचा त्याग आहे. कारण तत्त्व स्थिर, अचल आहे आणि त्या स्थिरतेचा त्यागच कर्म आहे.

भगवंताचे सृष्टि-रचनारूप कर्म हेच आदि कर्म आहे.† त्यापासूनच कर्म परंपरा चालू आहे. म्हणून 'कर्म' ह्याच्या अंतर्गत तीन प्रकारची कर्म येतात—(१) सृष्टि रचना, (२) सर्व क्रिया, ज्या फलजनक नसतात आणि (३) पाप-पुण्य (शुभाशुभ कर्म), जे फलजनक असतात.

भगवंताचे सृष्टि-रचनारूपी कर्म वास्तविक अकर्मच आहे. भगवंताने म्हटलेही आहे—**'तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्'** (गीता ४।१३) 'त्या सृष्टि-रचनेचा कर्ता असूनही मज अव्यय परमेश्वराला तू अकर्ता जाण.'

## अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्।
## अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर॥४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देहभृताम्, वर** | = हे देहधाऱ्यांमध्ये श्रेष्ठ अर्जुन! | **अधिभूतम्** | = आधिभूत आहेत, | **अत्र** | = या |
| **क्षरः** | = क्षर | **पुरुषः** | = पुरुष अर्थात् हिरण्यगर्भ ब्रह्मदेव | **देहे** | = देहात (अंतर्यामीरूपाने) |
| **भावः** | = भाव अर्थात् नाशवान् पदार्थ | **अधिदैवतम्** | = आधिदेव आहेत | **अहम् एव** | = मीच |
| | | **च** | = आणि | **अधियज्ञः** | = अधियज्ञ आहे. |

***व्याख्या—* अधिभूतं क्षरो भावः**—पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश या पंचमहाभूतापासून तयार झालेल्या प्रत्येक क्षणाला परिवर्तनशील असणाऱ्या नाशवान् सृष्टीला आधिभूत म्हणतात.

**पुरुषश्चाधिदैवतम्**—या ठिकाणी **''आधिदैवत''** (आधिदैव) पद आदिपुरुष हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाचे वाचक आहे. महासर्गाच्या आरंभी भगवंताच्या संकल्पाने सर्वात प्रथम ब्रह्मदेव प्रगट होतात. मग तेच सर्गाच्या आरंभी सर्व सृष्टीची रचना करतात.

**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर**—हे देहधाऱ्यामध्ये श्रेष्ठ अर्जुन! या देहात आधियज्ञ मीच आहे अर्थात् या मनुष्यशरीरात अंतर्यामीरूपाने मीच आहे. ‡भगवंतांनी

* जेव्हा कर्म करता करता थकवा येतो तेव्हा कर्तृत्वाभिमान, कर्मफलासक्ती आणि संचित कर्म जसेच्या तसे राहत असूनही प्राण्यांना झोप येत असते. झोपेत विश्राम मिळाल्याने थकावट दूर होत असते आणि कर्म करण्यासाठी शरीर, इंद्रिय, मन, बुद्धीत ताजेतवानेपणा येतो, सामर्थ्य येते. याच रीतीने प्राणी कर्तृत्वाभिमान, कर्मफलासक्ती आणि संचितकर्मासह प्रलयात सूक्ष्म प्रकृतीमध्ये आणि महाप्रलयात कारण प्रकृतीमध्ये लीन होतात. त्या लीन झालेल्या प्राण्यांचे संचितकर्म विश्राम मिळवून परिपक्व होऊन अर्थात् प्रारब्धरूप होऊन फल देण्यासाठी उन्मुख होतात. तेव्हा भगवंताचा संकल्प होतो आणि त्या संकल्पाने प्राण्यांचे जन्मारंभक कर्माशी विशेषतेने संबंध जुटण्याचे नावच ''कर्म'' आहे.

† 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टम्' (गीता ४।१३), 'कल्पादौ विसृजाम्यहम्' (९।७) 'विसृजामि पुनः पुनः' (९।८), 'अहं बीजप्रदः पिता' (१४।४)

‡ येथे या मनुष्यशरीरात म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, यात भगवंताच्या प्रेरणेला समजून घेण्याचे, स्वीकार करण्याचे आणि त्यानुसार आचरण करून तत्त्व प्राप्त करून घेण्याचे सामर्थ्य आहे. इतर शरीरात अंतर्यामीरूपाने परमात्मा राहत असतानाही त्या प्राण्यांचे ठिकाणी त्या तत्त्वाकडे दृष्टी टाकण्याचे सामर्थ्य नसते आणि मनुष्यशरीरात जो विवेक प्राप्त आहे, तो विवेक त्या शरीरात जागृत नसतो. म्हणून मनुष्याने हे शरीर असताना त्या तत्त्वाला प्राप्त करून घ्यावे. या दुर्लभ अवसराला व्यर्थ गमावू नये.

गीतेमध्ये "**हृदि सर्वस्य विष्ठितम्**" (१३।१७), "**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः**" (१५।१५), "**ईश्वरःसर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति**" (१८।६१) इत्यादीत, आपल्याला अंतर्यामीरूपाने सर्वांच्या हृदयात विद्यमान, असे म्हटले आहे.

**अहमेव अत्र* देहे**—म्हणण्याचे तात्पर्य, दुसऱ्या योनीत तर पूर्वकृत कर्माचा भोग असतो, नवीन कर्म तयार होत नाहीत, परंतु या मनुष्यशरीरात नवीन कर्मही तयार होत असतात. त्या कर्माचे प्रेरक अंतर्यामी भगवंत असतात.† जर मनुष्याने राग-द्वेष केला नाही तर त्याचे सर्व कर्म भगवंताच्या प्रेरणेनुसार शुद्ध होतात. अर्थात् बंधनकारक होत नाहीत आणि जर त्याने राग-द्वेषामुळे भगवंताच्या प्रेरणेनुसार कर्म केले नाही, तर त्याची कर्म बंधनकारक होतात. कारण राग आणि द्वेष मनुष्याचे भयंकर शत्रू आहेत. (३।३४) तात्पर्य, भगवंताच्या प्रेरणेने कधी निषिद्ध कर्म होतच नाहीत. श्रुती आणि स्मृती भगवंताच्या आज्ञा आहेत "**श्रुतिस्मृति ममैवाज्ञे**". म्हणून भगवान् श्रुती आणि स्मृतीच्या विरुद्ध प्रेरणा कशी करू शकतील? करू शकत नाहीत. निषिद्ध कर्म तर मनुष्य कामनेला वश होऊनच करत असतो. (३।३७) जर मनुष्य कामनेला वश झाला नाही, तर त्याच्याकडून स्वाभाविकच विहित कर्म होतील. ज्यांना अठराव्या अध्यायामध्ये सहज स्वभाव नियतकर्म नावाने म्हटले गेले आहे.

येथे अर्जुनासाठी "**देहभृतां वर**" म्हणण्याचे तात्पर्य, देहधाऱ्यांमध्ये तोच मनुष्य श्रेष्ठ असतो जो, "या देहात परमात्मा आहे" असे जाणून घेतो. असे जरी ज्ञान नसले, तरीपण असे मानून घ्यावे की, स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीराच्या कणाकणात परमात्मा आहेत आणि त्याचा अनुभव करणे हेच मनुष्यजन्माचे मुख्य ध्येय आहे. या ध्येयाच्या सिद्धीसाठी परमात्म्याच्या आज्ञेनुसारच काम करायचे आहे.

तीसऱ्या आणि चौथ्या श्लोकात जे ब्रह्म, आध्यात्म, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ यांचे वर्णन झाले आहे त्याला केवळ समजून घेण्यासाठी पाण्याचा एक दृष्टांत दिला जातो. जसे, जेव्हा आकाश स्वच्छ असते तेव्हा आपल्या आणि सूर्याच्या मध्यभागी कोणताही पदार्थ दिसत नसतानाही वास्तविक तेथे परमाणुरूपाने जलतत्त्व राहत असते. तेच जलतत्त्व वाफ बनते आणि वाफ घनीभूत झाली की ढग तयार होतो. ढगात जे जलकण राहतात त्यांच्या एकत्र होण्याने थेंब होतात. त्या थेंबामध्ये जेव्हा थंडीमुळे घनता येते तेव्हा त्याच थेंबाचे रूपांतर गारांमध्ये (बर्फ) होते. हे जल-तत्त्वाचे अत्यंत स्थूल रूप झाले. तसेच निर्गुण-निराकार "**ब्रह्म**" परमाणुरूपाने जलतत्त्व आहे. "आधियज्ञ" (व्यापक विष्णू) वाफरूपाने जल आहे. "आधिदैव" (हिरण्य गर्भ ब्रह्मदेव) ढगरूपाने जल आहेत, "आध्यात्म" (अनंत जीव) थेंबरूपाने जल आहे, "कर्म" (सृष्टिरचनारूपी कर्म) पावसाची क्रिया आहे आणि "आधिभूत" (भौतिक संपूर्ण सृष्टी) बर्फरूपाने जल आहे.

या वर्णनाचे तात्पर्य, जसे एकच जल परमाणू, वाफ, ढग, पावसाची क्रिया, थेंब, आणि गारा रूपाने (बर्फ) भिन्न भिन्न दिसते. परंतु वास्तविक आहे एकच! त्याचप्रमाणे एकच परमात्मतत्त्व ब्रह्म, आध्यात्म, कर्म, आधिभूत आधिदैव आणि आधियज्ञाच्या रूपाने भिन्न भिन्न प्रतीत होत असूनही तत्त्वतः एकच आहे. यालाच सातव्या अध्यायात "**समग्रम्**" (७।१) आणि "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९) म्हटले गेले आहे.

तात्त्विक दृष्टीने तर सर्व काही वासुदेवच आहे (७।१९). यातही जेव्हा विवेकदृष्टीने पाहिले जाते, तेव्हा शरीर-शरीरी, प्रकृती-पुरुष असे दोन भेद होतात. उपासनेच्या दृष्टीने पाहिले तर उपास्य (परमात्मा), उपासक (जीव) आणि त्याज्य (प्रकृतीचे कार्य-संसार) हे तीन भेद होतात. या तिन्हींना समजून घेण्यासाठी येथे त्यांचे सहा भेद केले जातात.

परमात्म्याचे दोन भेद ब्रह्म (निर्गुण) आणि आधियज्ञ (सगुण).

जीवाचे दोन भेद—आध्यात्म (सामान्य जीव जो बद्ध आहे) आणि आधिदैव (कारक पुरुष जे मुक्त आहेत)

संसाराचे दोन भेद—कर्म (जे परिवर्तानाचा पुंज आहे) आणि आधिभूत (पदार्थ)




* दुसऱ्या श्लोकात तर "अत्र" पद प्रकरणासाठी आले आहे, तसेच "अस्मिन्" पद देहासाठी आले आहे. परंतु येथे "अत्र" पद देहासाठीच आले आहे. कारण अर्जुनाने प्रश्नात "अत्र" पद देऊन प्रकरणाचा संकेत केला आहे म्हणून आता त्याचे उत्तर देताना प्रकरणासाठी "अत्र" पद देण्याची जरूरी नाही.

† कर्माची प्रेरणा भगवान् मनुष्याच्या स्वभावानुसार करतात. जर स्वभावात राग-द्वेष असतील तर त्या राग-द्वेषाच्या वशीभूत होणे अथवा न होणे मनुष्याच्या हातात आहे. तो शास्त्र, संत तसेच भगवंताचा आश्रय घेऊन आपल्या स्वभावाला बदलू शकतो.

## विशेष विचार

(१) संपूर्ण संसारात परमात्मा व्याप्त आहेत—"**मया ततमिदं सर्वम्**" (९।४), "**येन सर्वमिदं ततम्**" (१८।४६), सर्व संसार परमात्म्यात आहे—"**मयि सर्वमिदं प्रोतम्**" (७।७), सर्व कांही परमात्माच आहे—"**वासुदेवः सर्वम्**" (७।१९), सर्व संसार परमात्म्याचा आहे—"**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च**" (९।२४) "**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्**" (५।२९). अशा प्रकारे गीतेत निर-निराळया प्रकारची भगवंताची वचने आहेत. या सर्वांचा समन्वय कसा होईल ?सर्वांची संगती कशी लावावयाची ? यावर विचार केला जात आहे.

संसारात परमात्मप्राप्तीसाठी, आपल्या कल्याणासाठी साधन करणारे जितके काही साधक आहेत.* ते सर्व संसाराचा त्याग करू इच्छितात आणि परमात्म्याची प्राप्ती इच्छितात. कारण संसाराशी संबंध कायम ठेवल्याने नित्य राहणारी शांती आणि सुख मिळू शकत नाही. तर सदा अशांती आणि दु:खच मिळत राहते असा मनुष्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे. परमात्मा अनंत आनंदाचे स्वरूप आहेत. तेथे दु:खाचा लेशही नाही असे शास्त्रांचे कथन आहे आणि संतांचा अनुभव आहे.

आता विचार असा करायचा आहे की, साधकाला तर संसार प्रत्यक्षरूपाने दिसत असतो आणि परमात्म्याला केवळ तो मानत असतो, कारण परमात्मा प्रत्यक्ष दिसत नाहीत. शास्त्र आणि संत म्हणतात की "संसारात परमात्मा आहे आणि परमात्म्यात संसार आहे" हे मानून साधक साधन करीत असतो. त्या साधनेमध्ये जोपर्यंत संसाराची मुख्यता राहते, तोपर्यंत परमात्म्याची मान्यता गौण राहते. साधन करत करत जसजशी परमात्म्याविषयी धारणा (मान्यता) मुख्य होऊ लागते, तसतशी संसाराची मान्यता गौण होत जाते. परमात्म्याची धारणा संपूर्णपणे मुख्य झाल्यावर साधकाला हे स्पष्ट दिसू लागते की, संसार पूर्वी नव्हता आणि नंतर राहणार नाही; तसेच वर्तमानमध्ये जो "आहे" रूपाने दिसतो तोही प्रत्येक क्षणाला अभावामध्ये जात आहे. जेव्हा संसार नव्हता, तेव्हाही परमात्मा होते, जेव्हा संसार राहणार नाही, तेव्हाही परमात्मा राहतील आणि वर्तमानकाळी संसार प्रतिक्षण अभावामध्ये जात असतानाही परमात्मा जसेच्या तसे विद्यमान राहतात. तात्पर्य, संसाराचा नित्य अभाव आहे आणि परमात्म्याचा नित्य भाव आहे. अशा प्रकारे जेव्हा संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा संपूर्णपणे अभाव होतो तेव्हा सत्य स्वरूपाने "सर्व काही परमात्माच आहे" असा वास्तविक अनुभव होतो. असे झाल्यास साधक "**सिद्ध**" म्हणविला जातो. कारण "संसारात परमात्मा आहे आणि परमात्म्यात संसार आहे" अशी मान्यता संसाराची सत्ता समजल्यानेच होत होती आणि संसाराची सत्ता साधकाच्या आसक्तीनेच दिसत होती. तत्त्वतः सर्व काही परमात्माच आहेत.

(२) सत् आणि असत् सर्व परमात्माच आहेत. "**सदसच्चाहम्**" (९।१९) परमात्मा सत् म्हटले जाऊ शकत नाहीत आणि असत् म्हटले जाऊ शकत नाहीत—"**न सत्तन्नासदुच्यते**" (१३।१२), परमात्मा सत्‌ही आहेत आणि असत्‌ही आहेत आणि सत्-असत् दोन्हींच्या पलीकडीलही आहेत. "**सदसत्तत्परं यत्**" (११।३७) अशा प्रकारे गीतेत भिन्न-भिन्न वचने येतात. आता त्यांच्या संगतीच्या दृष्टीने विचार केला जात आहे.

परमात्मतत्त्व अत्यंत अलौकिक आणि विलक्षण आहे. त्या तत्त्वाचे वर्णन कोणीही करू शकत नाही. त्या तत्त्वाला इंद्रिये, मन, बुद्धी ग्रहण करू शकत नाहीत अर्थात् ते तत्त्व इंद्रिये, मन आणि बुद्धीच्या कक्षेत येत नाही. मात्र इंद्रिये, मन आणि बुद्धी त्यात विलीन होऊ शकतात. साधक त्या तत्त्वात स्वतः लीन होऊ शकतो, त्याला प्राप्त करू शकतो परंतु त्या तत्त्वाला आपल्या ताब्यात, अधिकारात, सीमेत आणू शकत नाही.

परमात्मतत्त्वाची प्राप्ती इच्छिणारे साधक दोन प्रकारचे असतात, एक विवेकप्रधान आणि दुसरे श्रद्धाप्रधान! अर्थात् एक बुद्धिप्रधान आणि दुसरे हृदयप्रधान असतात. विवेक-प्रधान साधकाच्या अंत:करणात विवेकाची अर्थात् जाणून घेण्याची मुख्यता राहते आणि श्रद्धाप्रधान साधकाच्या अंत:-करणात मानण्याची मुख्यता राहते. याचे तात्पर्य असे नव्हे की, विवेकप्रधान साधकाचे ठिकाणी श्रद्धा नसते आणि श्रद्धाप्रधान साधकाचे ठिकाणी विवेक नसतो. तर तात्पर्य हे आहे की, विवेकप्रधान साधकाचे ठिकाणी विवेकाची मुख्यता आणि त्याबरोबर श्रद्धा असते. तसेच श्रद्धाप्रधान साधकाचे ठिकाणी श्रद्धेची मुख्यता आणि त्याबरोबर विवेक राहतो. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे, जाणून घेणाऱ्यात मानणेही असते आणि मानणाऱ्यात जाणून घेणेही राहते. जाणून घेणारे जाणून घेऊन मानतात आणि मानणारे मानून जाणून घेतात. म्हणून

* सदा सर्वकाळ राहणारी शांती आणि अनंत सुख मिळावे, ज्यात अशांती आणि दु:खाचा लेशही नसावा, असा विचार करणारे "साधक" असतात. परंतु जे संसारामध्येच राहू इच्छितात, संसारापासूनच सुखाची इच्छा ठेवतात, सांसारिक संग्रह आणि भोगातच व्यस्त राहू इच्छितात आणि संसाराच्या सुख दु:खाला भोगत राहतात, ते साधक नसतात तर "संसारी" असतात. ते जन्म-मरणाच्या चक्रात फिरत राहतात.

कोणत्याही साधकात किंचित्मात्रही कमी राहत नाही.

साधक मग विवेकप्रधान असो अथवा श्रद्धाप्रधान असो परंतु साधनेत त्याची रुची, श्रद्धा, विश्वास आणि योग्यतेची प्रधानता असते. रुची, श्रद्धा, विश्वास आणि योग्यता एका साधनेविषयीच असल्याने साधक त्या तत्त्वाला लवकर समजून घेतो; परंतु रुची आणि श्रद्धा-विश्वास असूनही तशी योग्यता नसेल, अथवा योग्यता असूनही तशी रुची आणि श्रद्धा-विश्वास नसेल तर साधकाला ते साधन अवघड जाते. रुची असल्याने मन स्वाभाविक लागते, श्रद्धा-विश्वास असल्याने बुद्धी स्वाभाविक लागते आणि योग्यता असल्याने विषय योग्य रीतीने समजतो.

विवेकप्रधान साधक निर्गुण-निराकाराला पसंत करत असतो अर्थात् त्याची रुची निर्गुण-निराकाराचे ठिकाणी असते. श्रद्धाप्रधान साधक सगुण-साकाराला पसंत करतो अर्थात् त्याची रुची सगुण-साकाराविषयी असते. जो निर्गुण-निराकाराला पसंत करतो तो असे म्हणतो की, परमात्मतत्त्व सत्‌ही म्हणता येऊ शकत नाही आणि असत्‌ही म्हणता येऊ शकत नाही. जो सगुण-साकाराला पसंत करतो तो म्हणतो की, परमात्मा सत्‌ही आहेत आणि असत्‌ही आहेत आणि सत्-असत्‌हून पलिकडेही आहेत.

तात्पर्य चिन्मय तत्त्व तर नित्य जसेच्या तसे राहते आणि जड, असत् म्हणविला जाणारा संसार निरंतर बदलत राहतो. जेव्हा हा चेतन जीव बदलणाऱ्या संसाराला महत्त्व देतो, त्याच्याशी संबंध प्रस्थापित करतो, तेव्हा हा जन्म-मरणाच्या चक्रामध्ये फिरत राहतो. परंतु जेव्हा हा जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद करतो, तेव्हा याला स्वतः सिद्ध चिन्मय तत्त्वाचा अनुभव होतो. विवेकप्रधान साधक विवेक-विचाराने जडतेचा त्याग करीत असतो. जडतेचा त्याग झाल्यावर चिन्मय तत्त्व शिल्लक राहते अर्थात् नित्यप्राप्त तत्त्वाचा अनुभव होतो. श्रद्धाप्रधान साधक केवळ भगवंतालाच सम्मुख होतो, या कारणानेच तो जडतेशी विमुख होऊन भगवंताला प्रेमपूर्वक प्राप्त करून घेतो. विवेकप्रधान साधक तर सम, शांत, सत्घन, चित्घन, आनंदघन तत्त्वात अटळ स्थित होऊन अखंड आनंदाला प्राप्त होत असतो. परंतु श्रद्धाप्रधान साधक भगवंताशी अभिन्न होऊन, प्रेमाच्या अनंत, प्रत्येक क्षणी वाढणाऱ्या आनंदाला प्राप्त करून घेतो.

अशाप्रकारे दोन्हीही साधकांना जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेदपूर्वक चिन्मय तत्त्वाची प्राप्ती होत असते आणि ''सत्-असत् अर्थात् सर्व काही परमात्माच आहे'' असा अनुभव येतो.

**परिशिष्ट भाव**—परिवर्तनशील आणि नाशवान् क्रिया व सर्व पदार्थ 'क्षरभाव' आहेत, जी भगवंताची अपरा-प्रकृती आहे. ज्ञानात ब्रह्माशी एकता होते आणि प्रेमात अंतर्यामी भगवंताशी अभिन्नता होते. भगवंताने येथे अंतर्यामीला (आधियज्ञाला) आपले स्वरूप म्हटले आहे. म्हणून ब्रह्म तर विशेषण आहे आणि अंतर्यामी विशेष्य आहे—**'ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्'** (गीता १४। २७). तात्पर्य हे आहे की, ज्याला गीतेने 'समग्र' म्हटले आहे, तो सर्वांचा रचयिता आणि नियंता अंतर्यामी मीच आहे. याच अंतर्यामीला चौदाव्या अध्यायाच्या तीसऱ्या-चौथ्या श्लोकात **'मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम्'** आणि **'अहं बीज प्रदः पिता'** पदात **'अहम्'** शब्दाने म्हटले गेले आहे. गीतेत ब्रह्मासाठी म्हटले आहे—**'न सत्तन्नासदुच्यते'** (१३। १२) आणि समग्र भगवंतासाठी म्हटले गेले आहे— **'सदसच्चाहम्'** (९। १९), **'सदसत्तत्परं यत्'** (११। ३७)

***संबंध***—*दुसऱ्या श्लोकात अर्जुनाचा सातवा प्रश्न होता की, आपण अंतकाळी कसे जाणले जाता ? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो मनुष्य | **मुक्त्वा** | = सोडून | **याति** | = प्राप्त होतो, |
| **अन्तकाले च** | = अंतकाळीही | **प्रयाति** | = जातो, | **अत्र** | = यात |
| **माम्** | = माझे | **सः** | = तो | **संशयः** | = शंका |
| **स्मरन्** | = स्मरण करीत | **मद्भावम् एव** | = माझ्या स्वरूपालाच | **न अस्ति** | = नाही |
| **कलेवरम्** | = शरीर | | | | |

*व्याख्या*— **अन्तकाले च* मामेव....याति नास्त्यत्र संशयः**—''अंतकाळीही माझे स्मरण करत देहत्याग करतो'' याचे तात्पर्य या मनुष्याला जीवनात साधन भजन करून आपला उद्धार करून घेण्याचा अवसर दिला होता, परंतु

* येथे ''च'' अव्ययाचा अर्थ ''अपि'' अर्थात् ''सुद्धा'' आहे.

याने काहीही केलेच नाही. आता बिचारा हा माणूस अंतकाळी दुसरे साधन करण्यास असमर्थ आहे. म्हणून बस! आता केवळ माझे स्मरण करील तर त्याला माझी प्राप्ती होईल.

**मामेव स्मरन्**—याचे तात्पर्य, ऐकणे, समजून घेणे, आणि मानणे यात जे काही येते ते सर्व माझे समग्ररूप आहे. म्हणून त्याला जो माझेच स्वरूप समजेल त्याला अंतकाळी माझेच चिंतन होईल अर्थात् त्याने सर्व काही माझेच स्वरूप मानले आहे तर अंतकाळी ज्याचे कशाचे स्मरण होईल ते माझेच स्वरूप असेल म्हणून ते स्मरण माझेच समजले जाईल. माझे स्मरण झाल्याने त्याला माझीच प्राप्ती होईल.

**मद्भावम्**—हे म्हणण्याचे तात्पर्य, साधकाने मला ज्या कोणत्या भिन्न अथवा अभिन्नभावाने अर्थात् सगुण-निर्गुण, साकार-निराकार, द्विभुज-चतुर्भुज तसेच नाव, लीला, धाम, रूप इत्यादीने स्वीकार केले आहे, माझी उपासना केली आहे, अंत समयाच्या स्मरणानुसार तो माझ्या त्याच भावाला प्राप्त होत असतो.

जे भगवंताची उपासना करतात ते तर अंतसमयी उपास्याचे स्मरण झाल्याने त्याच उपास्याला अर्थात् भगवद्भावाला प्राप्त होतात. परंतु जे उपासना करत नाहीत, त्यांनाही अंतसमयी एखाद्या कारणाने भगवंताच्या एखाद्या नांव, रूप, लीला, धाम, इत्यादीचे स्मरण झाले तर तेही त्या उपासकाप्रमाणे त्याच भगवद्भावाला प्राप्त होतात. तात्पर्य, जसे गुणांत स्थित राहणाऱ्याची (१४।१८) आणि अंतकाळी जो कोणता गुण वाढल्याने त्याची तशीच गती होते. (१४।१४-१५) तसेच ज्याला अंतकाळी भगवंताचे स्मरण होते त्याचीही उपासकाप्रमाणे गती होत असते अर्थात् भगवंताची प्राप्ती होत असते.

भगवंताच्या सगुण-निर्गुण, साकार-निराकार इत्यादी अनेक रूपांचा आणि नाव, लीला, धाम, इत्यादीचा भेद तर साधकांच्या दृष्टीनेच असतो, शेवटी सर्व एक होतात. अर्थात् शेवटी सर्व एक ''मद्भाव''—भगवद्भावाला प्राप्त होतात. कारण भगवंताचे समग्र स्वरूप एकच आहे. परंतु गुणांनुसार गतीला प्राप्त होणारे अंती एक होऊ शकत नाहीत. कारण तिन्ही गुण (सत्त्व, रज आणि तम) वेगवेगळे आहेत. म्हणून गुणांनुसार त्यांच्या गतीही वेगवेगळ्या होत असतात.

भगवंताचे स्मरण करून देह त्याग करणाऱ्याचा तर भगवंताशी संबंध राहतो आणि गुणांनुसार शरीराचा त्याग करणाऱ्याचा गुणांशी संबंध राहतो म्हणून अंतकाळी भगवंताचे स्मरण करणारे भगवंताला सम्मुख होतात अर्थात् भगवंताला प्राप्त होतात आणि गुणांशी संबंध ठेवणारे गुणांच्या सम्मुख होतात अर्थात् गुणांचे कार्य जन्म-मरणाला प्राप्त होतात.

भगवंतांनी अशी एक सूट दिली आहे की, मरणासन्न व्यक्तीचे कसेही आचरण झालेले असेल, कोणतेही भाव राहिलेले असोत, कोणत्याही रीतीने जीवन गेलेले असो परंतु अंतकाळी जर तो भगवंताचे स्मरण करील तर त्याचे कल्याण होईल. कारण भगवंताने जीवाला, कल्याण करून घेण्यासाठीच हे मनुष्यशरीर दिले आहे आणि जीवाने त्या मनुष्यशरीराचा स्वीकार केला आहे. म्हणून जीवाचे कल्याण होईल तेव्हाच भगवंताचे या जीवाला मनुष्यशरीर देणे आणि जीवाने मनुष्यशरीर स्वीकारणे सफल होईल. परंतु तो आपला उद्धार करून घेतल्याविनाच आज संसाराला सोडून जात आहे. यासाठी भगवान् म्हणतात की, ''बाळा, तुझी आणि माझी दोघांची इज्जत रहावी म्हणून आता जाता जाता (अंतकाळी) जर तू माझे स्मरण करशील तर तुझे कल्याण होईल''. म्हणून प्रत्येक मनुष्याने जागरूक राहण्याची आवश्यकता आहे की, त्याने सर्व समयात भगवंताचे स्मरण करावे. कोणताही वेळ रिकामा जाऊ देऊ नये. कारण अंतकाळ केव्हा येईल याचा पत्ता लागत नाही. वास्तविक सर्व समय अंतकाळच आहे. अशी गोष्ट निश्चित सांगत येत नाही की, इतक्या वर्षांनी, इतक्या महिन्यांनी, इतक्या दिवसांनी मृत्यू येईल. समाजात तर असे दिसते की, गर्भातच काही बालकांचा मृत्यू होतो आणि काही बालके जन्मताच मृत्यू पावतात, कित्येक काही दिवसांनी, महिन्यांनी, वर्षांनी मृत्यू पावतात. अशा प्रकारे मृत्यूचा प्रवास निरंतर चालूच आहे. म्हणून सर्व काळात भगवंताचे स्मरण ठेवले पाहिजे आणि असेच समजावे की, हाच अंतकाळ आहे. नीतीशास्त्रात असे एक सुभाषित आहे की जर धर्माचरण करायचे असेल, कल्याण करून घ्यावयाचे असेल तर मृत्यूने माझे केस पकडून ठेवले आहेत, एक झटका दिला की खतम्! असा विचार नित्य केला पाहिजे—**''गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्''**.

भगवंताच्या उपर्युक्त दिलेल्या सवलतीचा प्रत्येक मनुष्याने लाभ घेतला पाहिजे. कोठे, कोणीही व्याधिग्रस्त, मरणासन्न व्यक्ती असेल तर तिच्या इष्टाचे चित्र अथवा मूर्ती तिला दाखवली पाहिजे. जशी त्याची उपासना असेल आणि ज्या भगवन्नामामध्ये रुची असेल, ज्याचा तो जप करत असेल, तेच भगवन्नाम त्याला ऐकवले पाहिजे, ज्या स्वरूपाविषयी त्याची श्रद्धा-विश्वास असेल त्याचे स्मरण करून दिले पाहिजे, भगवंताच्या महिमेचे वर्णन केले पाहिजे, गीतेचे श्लोक ऐकवले पाहिजेत. जर तो बेशुद्ध झाला असेल तर त्याच्याजवळ बसून भगवंताच्या नावाचा जप-कीर्तन केले पाहिजे, ज्यामुळे

त्या मरणासन्न व्यक्तीसमोर भगवत्संबंधी वातावरण कायम राहील. भगवत्संबंधी वायुमंडल राहिल्याने त्या ठिकाणी यमराजाचे दूत येऊ शकत नाहीत. अजामेळाकडून मृत्यूसमयी "नारायण" नावाचा उच्चार झाल्याने त्यावेळी भगवंताचे पार्षद आले आणि यमदूत यमराजाजवळ पळून गेले. त्यावेळी यमराजाने आपल्या दूतांना सांगितले की, "ज्या ठिकाणी भगवन्नामाचा जप-कीर्तन कथा इत्यादी होत असेल तेथे तुम्ही कधीही जाऊ नका कारण तेथे आपले राज्य नाही". *असे म्हणून यमराजांनी भगवंताचे स्मरण करून भगवंताची क्षमा मागितली की, "माझ्या दूतांकडून जो अपराध घडला आहे तो क्षमा करावा."†

अंतकाळी स्मरणाचे तात्पर्य, त्याने जे भगवंताचे स्वरूप मानलेले आहे, त्याचे स्मरण व्हावे अर्थात् त्याने पूर्वी राम, कृष्ण, विष्णू, शिव, शक्ती, गणेश, सूर्य सर्वव्यापक विश्वरूप परमात्मा इत्यादीपैकी ज्या रूपाला मानलेले आहे त्या स्वरूपाच्या नाम, रूप, लीला, धाम, गुण, प्रभाव इत्यादिचे स्मरण व्हावे. त्याचे स्मरण करत देह त्याग झाल्यास तो भगवंतालाच प्राप्त होतो. कारण भगवंताचे स्मरण झाल्याने "मी" शरीर आहे आणि शरीर "माझे" आहे याचे स्मरण त्यास राहत नाही तर केवळ भगवंताचेच स्मरण करत देहाचा त्याग होतो. म्हणून तो निःसंशय भगवंतासच प्राप्त होतो.

येथे शंका येते की, ज्या व्यक्तीने आयुष्यभर भजन-स्मरण केले नाही, कोणतेही साधन केले नाही, भगवंताशी संपूर्णपणे विमुख राहिला त्याला अंतकाळी भगवंताचे स्मरण कसे हाईल आणि त्याचे कल्याण कसे होईल ? याचे समाधान असे आहे की, अंतकाळी त्याच्यावर भगवंताची एखादी विशेष कृपा झाली अथवा त्याला एखाद्या संताचे दर्शन झाले असेल तर भगवंताचे स्मरण होऊन त्याचे कल्याण होत असते. त्याच्या कल्याणासाठी एखाद्या साधकाने त्याला भगवंताचे नाव, लीला, चरित्र ऐकवावे, पद (अभंग) गावे तर भगवंताचे स्मरण होऊन त्याचे कल्याण होते. जर मरणासन्न व्यक्तीला गीतेत रुची असेल तर त्याला गीतेचा आठवा अध्याय ऐकवावा, कारण त्या अध्यायात जीवाच्या सद्‌गतीचे विशेषत्वाने वर्णन आले आहे. हे ऐकल्याने त्याला भगवंताचे स्मरण होत असते. कारण तो वास्तविक परमात्म्याचाच अंश असल्याने त्याचा परमात्म्याशी स्वतः स्वाभाविक संबंध आहेच. जर अयोध्या, मथुरा, हरिद्वार, काशी इत्यादी एखाद्या तीर्थस्थलात त्याचे प्राणोत्क्रमण होईल तर त्या तीर्थाच्या प्रभावाने त्याला भगवंताची स्मृती होईल ‡तसेच ज्या ठिकाणी भगवंताच्या नावाचा जप, कीर्तन, कथा, सत्संग इत्यादी होत असेल त्या ठिकाणी त्याचा मृत्यू झाला तर त्या ठिकाणच्या पवित्र वातावरणाच्या प्रभावाने त्याला भगवंताची स्मृती होऊ शकते. अंतकाळी एखादी भयंकर स्थिती प्राप्त झाल्यास भयभीत होण्यानेही भगवंताचे स्मरण होऊ शकते. प्राणोत्क्रमण होताना शरीर, कुटुंब, रुपये इत्यादीची आशा ममता समाप्त झाली आणि हा भाव उत्पन्न झाल की "हे नाथ! आपल्याशिवाय माझे कोणी नाही केवळ आपणच माझे आहात" तर भगवंताची स्मृती होण्याने कल्याण होते. तसेच एखाद्या कारणाने अचानक आपल्या कल्याणाचा भाव निर्माण झाला तरीही कल्याण होऊ शकते卐. तसेच एखाद्या साधकाने एखाद्या प्राणी, जीव-जन्तूच्या मृत्यूसमयी "त्याचे कल्याण होवो" या भावनेने त्याला भगवन्नाम ऐकविले तर भगवन्नामाच्या प्रभावाने त्या प्राण्याचे कल्याण होते. शास्त्रात तर संत महापुरुषांच्या प्रभावासंबंधी विचित्र वर्णन ऐकण्यात येते की, एखाद्या संत महापुरुषाने एखाद्या मरणासन्न व्यक्तीला पाहिले अथवा त्याच्या मृत शरीराला (प्रेताला) पाहिले अथवा त्याच्या चितेच्या धुरास पाहिले अथवा त्याच्या चिताभस्माला पाहिले तरीही त्या जीवाचे कल्याण होते.$

---

* एवं विमृश्य सुधियो भगवत्यनन्ते सर्वात्मना विदधते खलु भावयोगम्।
ते मे न दण्डमर्हन्त्यथ यद्यमीषां स्यात् पातकं तदपि हन्त्युरुगायवादः॥ (श्रीमद्भा० ६।३।२६)

† तत्क्षम्यतां स भगवान् पुरुषः पुराणो नारायणः स्वपुरुषैर्यदसत्कृतं नः।
स्वानामहो न विदुषां रचिताञ्जलीनां क्षान्तिर्गरीयसि नमः पुरुषाय भूम्ने॥ (श्रीमद्भा० ६।३।३०)

‡ अयोध्या मथुरा माया काशी काञ्ची अवन्तिका।
पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः॥ (नारदपुराण, पूर्व० २७। ३५)

卐 एकदा एक सज्जन गंगेकडून येत होते आणि सर्वांना गंगाजलाचे आचमन देत होते. तेथे एक गृहस्थ उभे होते. त्याला जेव्हा हे आचमन देऊ लागले, त्यावेळी त्याने म्हटले—"माझी पापे फार आहेत, माझ्या माहीतीप्रमाणे मी फार पाप केले आहे. म्हणून एवढ्या थोड्या गंगाजलाने माझे पाप कसे नष्ट होतील ? माझे कल्याण कसे होईल ?" तर त्याने विचारले—"किती पाहिजे ?" त्याने म्हटले—"लोटा भरून द्या" -त्या सज्जनाने त्याला लोटा भरून गंगाजल दिले. त्याने ते लोटाभर गंगाजल पिऊन टाकले आणि म्हणाला, "आता माझे पाप राहणार नाही" ही सर्व घटना तेथील एका गृहस्थाने ऐकली होती. त्या गृहस्थाने नंतर सांगितले की, "जेव्हा ती व्यक्ती मरण पावली त्यावेळी त्याचे प्राण दहाव्या द्वाराला फोडून निघाले अर्थात् त्याचे कल्याण झाले."

$ महापातकयुक्ता वा युक्ता वा चोपपातकैः। परं पदं प्रयान्त्येव महद्भिरवलोकिताः॥
कलेवरं वा तद्भस्म तद्धूमं वापि सत्तम। यदि पश्यति पुण्यात्मा स प्रयाति परां गतिम्॥ (नारद पुराण पूर्व० १।७।७४-७५)

## मार्मिक गोष्ट

या अध्यायाच्या तीसऱ्या, चौथ्या श्लोकामध्ये ब्रह्म, आध्यात्म इत्यादी सहा गोष्टींचे वर्णन आलेले आहे, त्याचे तात्पर्य समग्ररूपाशी आहे आणि समग्ररूपाचे तात्पर्य "**वासुदेवः सर्वम्**" शी आहे अर्थात् सर्व काही वासुदेवच आहे. ज्याला समग्ररूपाचे ज्ञान झाले आहे त्याच्यासाठी अंतकाळाच्या स्मरणाविषयी म्हटलेच जाऊ शकत नाही. कारण ज्याच्या दृष्टीत संसाराची स्वतंत्र सत्ता नसून सर्व काही वासुदेवच आहे त्याच्यासाठी "अंतकाळी भगवंताचे चिंतन करावे" हे म्हणणेच संभवत नाही. जसे सामान्य मनुष्याला "मी आहे" या स्वतःच्या अस्तित्वाचे किंचित्मात्रही स्मरण करावे लागत नाही. तसेच त्या महापुरुषाला भगवंताचे स्मरण करावे लागत नाही, तर त्याला जागृती, स्वप्न, सुषुप्ती इत्यादी अवस्थेत भगवंताच्या अस्तित्वाचे स्वाभाविक निश्चित ज्ञान राहत असते.

पवित्राती पवित्र अथवा अपवित्राती अपवित्र कोणत्याही देशात, उत्तरायण-दक्षिणायण, शुक्लपक्ष-कृष्णपक्ष, दिवसा-रात्री, सकाळी-संध्याकाळी इत्यादी कोणत्याही काळात जागृत, स्वप्न, सुषुप्ती, मूर्छा, आजार, निरोगता इत्यादी कोणत्याही अवस्थेत आणि पवित्र अथवा अपवित्र कोणतीही वस्तू, व्यक्ती पदार्थ इत्यादिसमोर असताही त्या महापुरुषाच्या कल्याणाविषयी किंचिन्मात्रही संशय राहत नाही.

उपर्युक्त महापुरुषाशिवाय परमात्म्याची उपासना करणारे जितके काही साधक आहेत, ते मग साकाराचे उपासक असोत की निराकाराचे उपासक असोत, सगुणाचें उपासक असोत किंवा निर्गुणाचे उपासक असोत, राम, कृष्ण इत्यादी अवतारांचे उपासक असोत किंवा भगवंताच्या कोणत्याही नाम, रूप, लीला, धाम, इत्यादीची श्रद्धा-प्रेमपूर्वक उपासना करणारे का असेनात, त्या सर्वांना आपापल्या रुचीनुसार अंतसमयी भगवंताच्या कोणत्याही स्वरूप, नाव इत्यादीचे स्मरण झाले तर ते भगवंताचेच स्मरण होय.

साधकाशिवाय ज्या मनुष्यांचे ठिकाणी "भगवंत आहेत" असा सामान्य आस्तिक भाव असेल आणि ते कोणती विशेष उपासना करत नसतील त्यांनाही अंत-समयी अनेक कारणांनी भगवंताचे स्मरण होऊ शकते. जसे त्याने आपल्या जीवनात असे ऐकलेले आहे की, दुःखी माणसाचे दुःख भगवंत नाहीसे करतात. या संस्कारामुळे अंतसमयीची पीडा (दुःख) होताना भगवंताची आठवण येऊ शकते. अंतसमयी जर यमदूत दिसले त्यांच्या भीतीनेही भगवंताचे स्मरण होऊ शकते. एखादा सज्जन त्याला भगवंताचे चित्र दाखवील, त्याला भगवन्नाम ऐकवील, भगवंताची लीला-कथा ऐकवील, भक्तांचे चरित्र ऐकवील, त्याच्यासमोर कीर्तन केले जाईल तर त्याला भगवंताचे स्मरण होईल. अशा प्रकारे कोणत्याही कारणाने भगवंताकडे वृत्ती वळल्यास ते स्मरण भगवंताचेच स्मरण होय.

अशा साधक आणि सामान्य मनुष्यासाठीच अंत-काळात भगवत्स्मरणाविषयी सांगितले जाते, तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषासाठी नव्हे.

**परिशिष्ट भाव**—जो माणूस जिवंतपणी आपला उद्धार करू शकला नाही त्याने जर अंतकाळीही भगवंताचे स्मरण करीत शरीराचा त्याग केला तर तो भगवंतालाच प्राप्त होतो, यात शंका नाही. तर मग जो सततच भगवंताचे स्मरण करतो, तो अंतकाळी भगवंताचे स्मरण करीत भगवंताला प्राप्त होतो—ही काय सांगायची गोष्ट आहे! भगवंताने मनुष्याला (आपला उद्धार करण्याची) फार मोठी स्वतंत्रता दिली आहे, सवलत दिली आहे की, कोणत्याही रीतीने त्याचे कल्याण व्हावे. ही भगवंताची मनुष्यावर फार विशेष कृपा आहे.

***संबंध**—अंतकाळी माझे जे स्मरण करतात, ते तर मलाच प्राप्त होतात परंतु जे माझे स्मरण न करता अन्य कोणाचे स्मरण करतात ते कोणाला प्राप्त होतात? हे भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम्।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुन्तीपुत्र अर्जुन! | **स्मरन्** | = स्मरण करीत | | झालेला |
| **अन्ते** | = (मनुष्य) अंतकाळी | **कलेवरम्** | = शरीराचा | **तम् तम् एव** | = त्या त्याच (भावाला) |
| **यम् यम्** | = ज्या ज्या | **त्यजति** | = त्याग करतो | **एति** | = प्राप्त होतो अर्थात् त्या त्या योनीतच जन्माला येतो. |
| **वा, अपि** | = काही | **सदा,** | = तो त्या (अंतकाळाच्या) | | |
| **भावम्** | = भावाचे | **तद्भाव भावितः** | = भावाने सदा भावित | | |

*व्याख्या*— **यं यं वापि स्मरन्भावं....सदा तद्भावभावितः**—भगवंतांनी या नियमात दयेने भरलेली एक विलक्षण गोष्ट दाखविली आहे की, शेवटच्या चिंतनानुसार मनुष्याला त्या त्या योनीची प्राप्ती होत असते. जर हा नियम आहे तर माझ्या स्मरणाने माझी प्राप्ती होईलच. परम दयाळू भगवंतांनी आपल्यासाठी वेगळा कोणता विशेष नियम ठेवला नाही, तर सामान्य नियमातच आपला समावेश करून घेतला. भगवंताच्या दयेची ही केवढी विलक्षणता आहे की, जेवढ्या मूल्यात कुत्र्याची योनी मिळते त्याच मूल्यात भगवान् मिळतात.

**सदा तद्भावभावितः**—याचे तात्पर्य अंतकाळात ज्या भावाचे, ज्या कोणाचे चिंतन होत असते, प्राणोत्क्रमण झाल्यावर तो जीव जोपर्यंत दुसरे शरीर धारण करत नाही तोपर्यंत तो त्या भावाने भावित राहतो अर्थात् अंतकाळाचे चिंतन (स्मरण) तसेच स्थायी कायम राहते. अंतकाळाच्या त्या चिंतनानुसारच त्याचे मानसिक शरीर तयार होते आणि मानसिक शरीरानुसार तो दुसरे शरीर धारण करत असतो. कारण अंतकाळच्या चिंतनाला बदलण्यासाठी तेथे कोणतीच संधी नसते, शक्ती नसते आणि बदलण्याची स्वतंत्रताही नसते. तसेच नवीन चिंतन करण्याचा कोणता अधिकारही नसतो. म्हणून तो त्या चिंतनातच तल्लीन राहत असतो. मग त्याचा ज्या कोणाशी कर्माचा किंचिन्मात्रही संबंध राहतो, वायू, जल, खाद्यपदार्थ इत्यादीद्वारा तो त्याच पुरुष जातीत प्रविष्ट होतो. मग पुरुष जातीपासून स्त्रीजातीत जाऊन नियतकाळी जन्म घेतो. जसे कुत्रा पाळणारा एखादा मनुष्य अंतकाळी कुत्र्याचे स्मरण करून देह त्याग करतो तर त्याचे मानसिक शरीर कुत्र्याचे बनते, ज्यामुळे तो पुढे क्रमाने कुत्राच बनतो अर्थात् कुत्र्याच्या योनीत जन्माला येतो. याप्रमाणे अंतकाळी ज्या कोणाचे स्मरण होते त्यानुसार जन्म घ्यावा लागतो. परंतु याचे तात्पर्य असे नाही की, घराचे स्मरण करत जर प्राणोत्क्रमण झाले तर तो घरच बनतो, धनाचे स्मरण करत मृत्यू आला तर धन बनेल इत्यादी! तर घराचे चिंतन झाले तर त्या घरात उंदीर, पाल अशा योनीत तो जन्माला येईल आणि धनाचे चिंतन झाले तर तो साप बनेल इत्यादी. तात्पर्य अंतकाळाच्या चिंतनाचा नियम सजीव प्राण्यांसाठीच आहे. निर्जीव (जड) पदार्थासाठी नव्हे. म्हणून जड पदार्थाचे चिंतन झाल्यास तो त्याच्या संबंधित एखादा सजीव प्राणी बनेल.

मनुष्येतर (पशु-पक्षी इत्यादी) प्राण्यांना आपापल्या कर्मानुसारच अंतकाळात स्मरण होत असते आणि त्यानुसारच त्यांचा पुढील जन्म होत असतो. अशा रीतीने अंतकाळाच्या स्मरणाचा नियम सर्व ठिकाणी लागू पडतो. परंतु मनुष्यशरीरात ही विशेषता आहे की, त्याच्या अंतकाळाचे स्मरण कर्माच्या अधीन नाही तर पुरुषार्थाच्या अधीन आहे. पुरुषार्थात मनुष्य संपूर्णपणे स्वतंत्र आहे. म्हणूनच तर अन्य योनीपेक्षा या मनुष्यजन्माचे अधिक महत्त्व आहे.

मनुष्य या शरीरात स्वतंत्रतेने ज्याच्याशी संबंध प्रस्थापित करत असतो त्या संबंधानुसारच त्याचा इतर योनीत जन्म होऊ शकतो. परंतु अंतकाळी जर त्याने भगवंताचे स्मरण केले तर त्याचे सर्व संबंध तुटून जातील. कारण ते संबंध वास्तविक नाहीत तर वर्तमानात बनविलेले आहेत, कृत्रिम आहेत परंतु भगवंताशी संबंध स्वतः सिद्ध आहे, बनविलेला नाही. म्हणून भगवंताचे स्मरण झाल्याने त्याचे सर्व कृत्रिम संबंध तुटून जातात.

## विशेष गोष्ट

(१) दुसऱ्या जन्माची प्राप्ती अंतकाळात झालेल्या चिंतनानुसार होत असते. ज्याचा जसा स्वभाव असतो, अंतकाळी त्याला बहुतेक तसेच चिंतन होत असते. जसे ज्याचा कुत्रे पाळण्याचा स्वभाव असतो, अंतकाळी त्याला कुत्र्याचे चिंतन होत असते. ते चिंतन आकाशवाणी केंद्राकडून प्रसारित (विशेष शक्तियुक्त) केलेल्या ध्वनीप्रमाणे सर्व ठिकाणी पसरते. जसे आकाशवाणी केंद्राकडून प्रसारित झालेला ध्वनी रेडियो द्वारा (एखाद्या विशेष नंबरवर) पकडला जातो. तसेच अंतकालीन कुत्र्याचे चिंतन संबंधित कुत्र्याकडून (ज्याच्याशी कोणतातरी ऋणानुबंध अथवा कर्मादिकांचा कोणता ना कोणता संबंध असतो) पकडले जाते. मग जीव सूक्ष्म आणि कारणशरीराला बरोबर घेऊन अन्न, पाणी, हवा (श्वास) इत्यादीद्वारा त्या कुत्र्यात प्रविष्ट होतो. मग कुत्रीमध्ये प्रविष्ट होऊन गर्भ बनतो आणि निश्चित वेळी कुत्र्याच्या शरीरापासून जन्म घेतो.

अंतकालीन चिंतन आणि त्यानुसार होणाऱ्या गतीला एका दृष्टांताद्वारे समजून घेतले जाऊ शकते. एक माणूस फोटो काढून घेण्यासाठी गेला. जेव्हा फोटो काढून घेण्यासाठी बसला तेव्हा फोटोग्राफरने म्हटले की, फोटो घेत असताना हलू-डोलू नका, स्मित हास्यवदन ठेवा. पण ऐन फोटो घेण्याच्या क्षणीच त्याच्या नाकावर माशी बसली. हाताने माशी उडवणे बरोबर नाही असे समजून (की फोटोमध्ये हे दृष्य येऊ नये) त्याने आपल्या नाकाला मोडले. ठीक त्याच वेळी त्याचा फोटो काढला गेला. त्या माणसाने फोटोग्राफरला आपला फोटो मागितला, त्यावेळी फोटोग्राफर-

ने म्हटले की, फोटो प्रत्यक्ष हाती येण्यासाठी काही काळ लागेल, आपण अमुक दिवशी येऊन आपला फोटो घेऊन जाणे. तो दिवस आल्यावर फोटोग्राफरने त्याला फोटो दाखविला तर त्यात (आपले मोडलेले नाक) वाईटरूपाला पाहून तो माणूस फार नाराज झाला की, तुम्ही माझा फोटो बिघडून टाकला. फोटोग्राफर म्हणाला यात माझी काय चूक आहे ? फोटो घेताना आपण आपली जशी आकृती ठेवली होती, तसाच फोटो आला आहे. आता फोटोत परिवर्तन होऊ शकत नाही. याप्रमाणे अंतकाळी मनुष्याचे जसे चिंतन होईल तशीच योनी त्याला प्राप्त हाईल.

फोटो घेण्याचा वेळ तर प्रथम पासूनच माहीत असतो परंतु मृत्यू केव्हा येईल याचा आपल्याला काही पत्ता माहीत नसतो. म्हणून आपला स्वभाव, चिंतन शुद्ध ठेवून सदैव सावध राहिले पाहिजे आणि भगवंताचे नित्य निरंतर स्मरण केले पाहिजे. (८।५, ७)

(२) अंतकाळीन गतीच्या नियमात भगवंताची न्याय-कारिता आणि दयाळूता दोन्हीही भरलेल्या आहेत. सामान्य दृष्टीने पाहिले तर न्याय आणि दया परस्पर विरोधी वाटतात. जर न्याय कराल तर दयाळूता सिद्ध होणार नाही आणि दया केली जाईल तर न्याय सिद्ध होणार नाही. कारण न्यायात योग्य तो निर्णय घेतला जात असतो, सवलत नसते आणि दयेत सवलत असते. परंतु हा विरोध वास्तविक सामान्य आणि क्रूर मनुष्याने बनविलेल्या नियमातच येऊ शकतो, भगवंताच्या बनविलेल्या नियमात नव्हे, कारण भगवान् परम दयाळू आणि प्राणीमात्राचे सुहृद आहेत—"**सुहृदं सर्व-भूतानाम्**" (५।२९). भगवंताचे सर्व न्याय, कायदे दयेने परिपूर्ण असतात.

मनुष्य अंतकाळी जसे स्मरण करतो त्यानुसारच त्याची गती होत असते. जर एखादा कुत्र्याचे चिंतन करत मृत्यू पावला तर तो क्रमाने कुत्राच बनतो. हा भगवंताचा मनुष्यासाठी लागू होणारा न्याय झाला. कारण भगवंतांनी मनुष्यमात्राला ही स्वतंत्रता दिली आहे की, तो मग माझे (भगवंताचे) स्मरण करो अथवा इतरांचे स्मरण करो. म्हणून भगवंताचा हा "न्याय" आहे. जेवढ्या मूल्यात कुत्र्याची योनी मिळते, तेवढ्याच मूल्यात भगवान् प्राप्त होतात ही मनुष्यमात्रासाठी भगवंताची "दया" आहे. जर मनुष्याने भगवंताच्या ह्या न्यायकारिता आणि दयाळूपणाकडे दृष्टी ठेवली तर तो भगवंताचे ठिकाणी आकृष्ट होऊन जाईल.

**परिशिष्ट भाव**—सातव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात भगवंताने '**यो यो यां यां तनुं भक्तः**' पदांनी उपासनेच्या विषयात मनुष्याची स्वतंत्रता सांगितली होती, आता या श्लोकात गतीच्या विषयात मनुष्याची स्वतंत्रता सांगतात. तात्पर्य हे आहे की, स्वतःची उपासना आणि गती ह्या विषयात मनुष्य स्वतंत्र आहे.* आणि त्यात भगवान् स्वतःच्या दयाळू स्वभावामुळे बाधा करीत नाहीत उलट त्याला साहाय्य करतात. मनुष्य स्वतःच मिळालेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून दुर्गतीला प्राप्त होतो.

मनुष्यशरीराचे असे महत्त्व आहे की, तो जे काही इच्छिल तेच त्याला मिळू शकते. असे कोणतेही दुर्लभ पद नाही जे मनुष्याला मिळू शकत नाही. ज्यात लाभाचा (सुखाचा) तर अंत पार नाही आणि दुःखाचा लेशही नाही, असे पद मनुष्य प्राप्त करू शकतो. (६। २२) परंतु भोग आणि संग्रह यात लिप्त होऊन मनुष्य चौऱ्यांशी लक्ष योनी आणि नरकांमध्ये जातो. म्हणून भगवान् दुःखाने म्हणतात—'**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि**' (९। ३), '**माम प्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्**' (१६। २०).

मनुष्य अंतकाळी जसे चिंतन करतो, तशीच त्याची गती होते. या विषयात एक श्लोक येतो—

**वासना यस्य यत्र स्यात् स तं स्वप्नेषु पश्यति।**
**स्वप्नवन्मरणे ज्ञेयं वासना तु वपुर्नृणाम्॥**

'ज्या मनुष्याची जशी वासना असते, त्या वासनेनुरूप त्याला स्वप्न पडते. स्वप्नाप्रमाणेच मृत्यू होतो अर्थात् वासनेनुरूपच अंतकाळी चिंतन होते आणि त्या चिंतनानुसारच मनुष्याला गती मिळते.'

तात्पर्य हे आहे की, मृत्युकाळी जसे आपण इच्छितो, तसे चिंतन करू शकत नाही, तर आपल्या अंतःकरणात जशी वासना असेल तसेच चिंतन आपोआप होईल आणि त्यानुसारच गती होईल. ज्या वस्तूला आपण सत्ता आणि महत्ता देतो,

* नर तन सम नहिं कवनिउ देही। जीव चराचर जाचत तेही॥
नरक स्वर्ग अपबर्ग निसेनी। ग्यान बिराग भगति सुभ देनी॥ (मानस, उत्तर० १२१। ५)

त्याच्याशी संबंध जोडतो, त्यापासून सुख घेतो, त्याचीच वासना निर्माण होते. जर संसारात सुखबुद्धी राहिली नाही तर संसाराची वासना निर्माण होणार नाही. वासना निर्माण झाली नाही तर मृत्युकाळी जे काही चिंतन होईल ते भगवंताचेच चिंतन होईल. कारण सिद्धांताच्या दृष्टिकोनातून सर्व काही भगवान्‌च आहेत—'**वासुदेवः सर्वम्**'.

'**तं तमेवैति**'—ज्याप्रमाणे सुईच्या मागे-मागे (त्याग मार्गाने) धागा जातो, त्याचप्रमाणे मनुष्यसुद्धा अंतकाळी भावानुसार त्याच गतीला जातो.

***संबंध***—*जर अंतकाळाच्या स्मरणानुसारच गती मिळते तर मग अंतकाळात भगवंताचे स्मरण होण्यासाठी काय केले पाहिजे. याचा उपाय पुढील श्लोकात सांगतात.*

## तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च।
## मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून (तू) | **अनुस्मर** | = स्मरण कर (आणि) | | अर्पित करणारा (तू) |
| **सर्वेषु** | = सर्व | **युध्य, च** | = युद्धही कर. | **असंशयम्** | = निःसंदेह |
| **कालेषु** | = काळात | **मयि** | = माझ्यात | **माम् एव** | = मलाच |
| **माम्** | = माझे | **अर्पित मनोबुद्धिः** | = मन आणि बुद्धी | **एष्यसि** | = प्राप्त होशील. |

*व्याख्या*— **तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च**—या ठिकाणी "**सर्वेषु कालेषु**" पदांचा संबंध केवळ स्मरणाशीच आहे, युद्धाशी नव्हे. कारण युद्ध सर्व काळात, निरंतर होऊ शकत नाही. कोणतीही क्रिया निरंतर होऊ शकत नाही तर यथाकाळीच होऊ शकते. कारण प्रत्येक क्रियेचा आरंभ आणि अंत होत असतो. ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे. परंतु भगवत्प्राप्तीचा उद्देश असल्याने भगवंताचे स्मरण सर्व काळात होत असते कारण उद्देशा- विषयीची जागरूकता नित्य निरंतर असते.

सर्व काळात स्मरण करण्यासाठी, असे म्हणण्याचे तात्पर्य, प्रत्येक कार्यात समयाचा विभाग असतो. जसे हा समय झोपण्याचा आणि हा समय जागण्याचा असतो. हा समय नित्यकर्माचा आहे, हा समय जीविकेसाठी कामधंदा करण्याचा आहे, हा समय भोजनाचा आहे इत्यादी इत्यादी. परंतु भगवंताच्या स्मरणासाठी समयाचा विभाग नसावा. भगवंताचे तर सर्व काळात स्मरण राहिलेच पाहिजे.

**युध्य च**—हे म्हणण्याचे तात्पर्य, या ठिकाणी अर्जुना-समोर युद्धरूप कर्तव्यकर्म आहे जे त्यांना सहज प्राप्त झालेले आहे—"**यदृच्छया चोपपन्नम्**" (२।३२) तसेच मनुष्याला कर्तव्यरूपाने जे कर्म समोर येईल त्याला भगवंताचे स्मरण करीत पार पाडले पाहिजे. त्यात भगवंताचे स्मरण मुख्य असावे आणि कर्तव्यकर्म गौण असावे.

**अनुस्मर**—याचा अर्थ स्मरणामागे स्मरण होत रहावे असा आहे अर्थात् निरंतर स्मरण होत रहावे. दुसरा अर्थ असा आहे की, भगवंत कोणत्याही जीवाला विसरत नाहीत. भगवंतांनी सातव्या अध्यायात "**वेदाहम्**" (७।२६) म्हणून वर्तमान समयात सर्व जीवांना स्वतः जाणत असल्याविषयी म्हटले आहे. जर भगवान् वर्तमानकाळात सर्वांना जाणत असतात, भगवंताचे सर्व जीवांचे स्मरण करणे स्वाभाविक झाले. आता हा जीव भगवंताचे स्मरण करेल तर त्याचा उद्धारच होईल.

भगवंताच्या स्मरणाच्या जागृतीसाठी भगवंताशी आत्मीयता केली पाहिजे. ही आत्मीयता जितकी दृढ होईल तितकीच भगवंताची स्मृती वारंवार होत राहील.

**मय्यर्पितमनोबुद्धिः**—माझ्या ठिकाणी मन, बुद्धी अर्पण करण्याचा साधारण अर्थ असा होतो की, मनाने भगवंताचे चिंतन व्हावे आणि बुद्धीने परमात्म्याचा निश्चय केला जावा. परंतु याचा वास्तविक अर्थ, मन, बुद्धि, इंद्रिये, शरीर इत्यादींना भगवंताचेच समजणे, कधी चुकूनही यांना आपले न समजणे, हा आहे. कारण जितके काही प्राकृत पदार्थ आहेत ते सर्वचे सर्व भगवंताचेच आहेत. त्या पदार्थांना आपले मानणेच चूक आहे. साधक त्यांना जोपर्यंत आपले मानतो, तोपर्यंत ते शुद्ध असू शकत नाहीत कारण त्यांना आपले समजणेच मुख्य अशुद्धी आहे आणि या अशुद्धीतूनच अनेक अशुद्धी निर्माण होतात.

वास्तविक मनुष्याचा संबंध केवळ भगवंताशीच आहे. प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य यांच्याशी मनुष्याचा संबंध कधीही नव्हता, आत्ताही नाही आणि पुढेही राहणार नाही. कारण मनुष्य परमात्म्याचा साक्षात अंश आहे. म्हणून त्याचा प्रकृतीशी संबंध कसा होऊ शकतो? म्हणून साधकाने मन आणि बुद्धीला भगवंताचेच समजून भगवंताला अर्पण करावे. मग त्याला स्वाभाविकच भगवंताची प्राप्ती होईल. कारण

प्रकृतीचे कार्य शरीर, मन, बुद्धी इत्यादीशी संबंध प्रस्थापित करण्यानेच तो भगवंतापासून विमुख झाला होता.

ते प्राकृत पदार्थ कसे आहेत, या विषयात दार्शनिक मतभेद तर आहेत परंतु ''ते आपले नाहीत आणि आपण त्यांचे नाहीत'' या वास्तविकतेत कोणताही मतभेद नाही अर्थात् ही गोष्ट सर्व दर्शनकारांना मान्य आहे. या दर्शनकारां-पैकी जे ईश्वरवादी आहेत, ते सर्व या प्राकृत पदार्थांना ईश्वराचेच मानतात आणि दुसरे जितके दर्शनकार आहेत ते त्या पदार्थांना मग प्रकृतीचे मानोत अथवा परमात्म्याचे मानोत परंतु दार्शनिक दृष्टीने ते त्यांना आपले मानू शकत नाहीत. म्हणून साधकाने त्या सर्व पदार्थांना ईश्वराचेच मानून ईश्वराला अर्पण करावे. असे केल्याने त्यांचा ''आपण भगवंताचेच होतो आणि भगवंताचेच राहणार'' भगवंताशी असा नित्य संबंध जागृत होईल.

**मामेवैष्यस्यसंशयम्**—माझ्या ठिकाणी मन, बुद्धी अर्पण करणारा झाल्याने तू मलाच प्राप्त होशील यात काही संशय नाही. कारण मी तुला नित्यप्राप्त आहे. अप्राप्तीचा अनुभव तर कधीही प्राप्त न होणाऱ्या शरीर आणि संसाराला आपले समजल्याने, त्यांच्याशी संबंध प्रस्थापित करण्यानेच होत असतो. नित्यप्राप्त तत्त्वाचा कधीही अभाव झाला नाही आणि होऊ शकत नाही. जर तू मन, बुद्धी आणि स्वत: ला मला अर्पण करशील तर तुझा जो माझ्याशी नित्य संबंध आहे तो प्रगट होईल यात काही संशय नाही.

## स्मरणसंबंधी विशेष विचार

स्मरण तीन प्रकाराने होत असते. बोधजन्य, संबंध-जन्य आणि क्रियाजन्य. बोधजन्य स्मरणाचा कधी अभाव होत नाही. जोपर्यंत संबंधाचा त्याग होत नाही, तोपर्यंत संबंधजन्य स्मरण कायम राहते. क्रियाजन्य स्मरण निरंतर राहत नसते. या तिन्ही प्रकारच्या स्मरणाचा विस्तार याप्रमाणे आहे—

**( १ ) बोधजन्य स्मरण**—आपले जे अस्तित्व आहे त्याचे स्मरण करावे लागत नाही. परंतु शरीराशी जी एकता मानली आहे ती चूक आहे, बोध झाल्यावर ती चूक दुरुस्त होत असते मग आपले अस्तित्व स्वत: सिद्ध राहते. गीतेत भगवान् म्हणतात ''तू, मी आणि हे राजेलोक पूर्वी नव्हते, असेही नाही आणि भविष्यात राहणार नाहीत, असेही नाही'' (२।१२) अर्थात् निश्चितच पूर्वी होते आणि निश्चितच पुढे राहतील. ''जो पूर्वी सर्ग महासर्ग आणि प्रलय-महाप्रलया मध्ये होता, तोच हा प्राणी समुदाय उत्पन्न होऊन पुन्हा-पुन्हा नष्ट होत असतो'' (८।१९) यात ''तोच हा प्राणी-समुदाय'' तर परमात्म्याचा अंश आहे आणि ''उत्पन्न होऊन पुन्हा-पुन्हा नष्ट होणारे'' शरीर आहे. जर नष्ट होणाऱ्या भागाचा विवेकपूर्वक संपूर्णपणे त्याग केला तर आपल्या अस्तित्वाचा स्पष्टपणे बोध होईल. हे बोधजन्य स्मरण नित्य-निरंतर कायम राहते. कधी नष्ट होत नाही कारण हे स्मरण आपल्या नित्य स्वरूपाचे असते.

**( २ ) सम्बधजन्य स्मरण**—ज्याला आपण स्वत: मानून घेतो ते संबंधजन्य स्मरण असते. जसे ''शरीर आपले आहे संसार आपला आहे'' इत्यादी. हा मानलेला संबंध जोपर्यंत आपण ''हे आपले नाही'' असे मानणार नाही, तोपर्यंत समाप्त होत नाही. परंतु भगवंत वास्तविक आपले आहेत. आपण नाही मानले तरी, आपले आहेत आणि मानले तरी, आपले आहेत, आपण जाणून घेतले तरी, आपले आहेत, नाही जाणून घेतले तरी, आपले आहेत, आपल्याला ते आपले वाटले तरी, आपले आहेत, आपल्याला आपले वाटले नाहीत तरी, आपले आहेत. आपण सर्व त्यांचे अंश आहोत आणि ते अंशी आहेत. आपण त्यांच्यापासून वेगळे होऊच शकत नाहीत आणि ते आपल्यापासून वेगळे होऊच शकत नाहीत. जोपर्यंत आपण शरीर-संसाराशी आपला संबंध मानतो, तोपर्यंत भगवंताचा हा वास्तविक संबंध स्पष्ट होत नाही. जेव्हा आपण शरीर आणि संसाराच्या संबंधाचा अत्यंत अभाव स्वीकार करतो, तेव्हा भगवंताचा नित्यसंबंध आपोआप जागृत होतो. मग भगवंताचे स्मरण नित्य-निरंतर कायम राहते.

**( ३ ) क्रियाजन्य स्मरण**—क्रियाजन्य स्मरण अभ्यास-जन्य असते. जसे स्त्रीया डोक्यावर पाण्याची घागर घेऊन चालतात, त्यावेळी त्या आपले दोन्ही हात मोकळे सोडतात आणि दुसऱ्या स्त्रीयांबरोबर गोष्टीही करत चालतात परंतु डोक्यावर घेतलेल्या घागरीविषयीची सावधानी निरंतर राहत असते. सर्कशीत काम करणारा नट दोरावरून चालत असता गातोही आणि बोलतोही पण दोराकडे लक्ष मात्र निरंतर असते. ड्रायव्हर मोटार चालवतो, हाताने गियर बदलत असतो, हँडल फिरवत असतो आणि मालकाशी बोलतही असतो, परंतु रत्याकडे लक्ष निरंतर असते. तसेच संपूर्ण क्रियेत भगवंताचे निरंतर स्मरण ठेवणे अभ्यासजन्य स्मरण आहे.

या अभ्यासजन्य स्मरणाचेही तीन प्रकार आहेत.

(क) संसाराचे कार्य करत असताना भगवंताचे स्मरण ठेवणे—यात संसारिक कार्याची मुख्यता आणि भगवंताच्या स्मरणाची गौणता राहते. म्हणून यात हा भाव असतो की, संसाराचे काम बिघडू नये, योग्य रीतीने होत रहावे आणि

त्याबरोबर भगवंताचे स्मरणही होत रहावे.

(ख) **भगवंताचे स्मरण करत असताना संसाराचे कार्य करणे**—यात भगवंताच्या स्मरणाची मुख्यता आणि संसारिक कार्याची गौणता राहते. यात भगवंताच्या नामस्मरणात चूक होऊ नये ही सावधानी राहते आणि संसाराच्या कामात चूक जरी झाली तरी त्याची परवा नसते. कारण साधकात ही जागरुकता असते की, संसाराचे काम व्यवस्थित झाले तरी शेवटी राहणारच नाही आणि बिघडले तरी शेवटी त्याचा नाशच होणार आहे. म्हणून त्यात भगवत्स्मरणाची चूक होत नाही.

(ग) **कार्याला भगवंताचेच समजणे**—यात काम धंदा करत असतानाही एक विलक्षण आनंद राहत असतो की, ''माझे अहोभाग्य आहे की, मी भगवंताचेच काम करत आहे, भगवंताचीच सेवा करत आहे''. म्हणून यात भगवंताची स्मृती विशेषतेने राहते. जसे एखादा सज्जन आपल्या कन्येच्या विवाहसमयी कन्येसाठी निरनिराळ्या वस्तू खरेदी करतो, अनेक प्रकारचे कार्य करतो, अनेक व्यक्तींना निमंत्रण पाठवितो. परंतु अनेक प्रकारचे कार्य करत असूनही ''कन्येचा विवाह करवयचा आहे'' ही गोष्ट त्याच्या निरंतर आठवणीत राहते. कन्येशी भगवंतासमान पूज्यभावपूर्वक संबंध नसतो तरीपण तिच्या विवाहासाठी कार्य करत असताना तिचे स्मरण निरंतर राहते, मग भगवंतासाठी कार्य करत असताना भगवंताची पूज्यभावासहित आपुलकीची गोड स्मृती कायम राहील यात काय संशय ?

भगवत्संबंधी कार्य दोन प्रकारचे असते (१) **स्वरूपाने**— भगवंताच्या नावाचा जप आणि कीर्तन करणे, भगवंताच्या लीलांचे श्रवण, चिंतन, पठन-पाठन इत्यादी करणे—हे स्वरूपाने भगवत्संबधी काम आहे (२) **भावाने**—संसाराचे काम करत असतांनाही ''जर सर्व संसार भगवंताचा आहे तर संसाराचे कामही भगवंताचेच झाले. याला भगवंताच्या नात्यानेच करायचे आहे, भगवंताच्या प्रसन्नतेसाठीच करायचे आहे. या कामात आपल्याला काहीही घ्यायचे नाही. भगवंताने आपल्याला ज्या वर्णात उत्पन्न केले आहे, ज्या आश्रमात ठेवले आहे त्यात भगवंताच्या आज्ञेनुसार योग्य काम करायचे आहे'' असा भाव राहिल्याने ते काम सांसारिक असूनही भगवंताचे होते.

[सातव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी सात गोष्टी सांगितल्या होत्या त्याच सात विषयावर अर्जुनाने आठव्या अध्यायाच्या आरंभी सात प्रश्न केले आणि हे प्रकरणसुद्धा सात श्लोकात समाप्त झाले.]

**परिशिष्ट भाव**—भगवंताने सातव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात म्हटले— '**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्त चेतसः**' त्यावर अर्जुनाने आठव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात प्रश्न केला—'**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः**'। त्याच्या उत्तरात भगवंताने म्हटले की, जो मनुष्य अंतकाळी माझे स्मरण करीत शरीराचा त्याग करतो, तो मलाच प्राप्त होतो. (८।५) परंतु हा नियम केवळ माझ्या प्राप्तीच्या विषयात नाही. मनुष्य ज्याचे ज्याचे स्मरण करीत शरीराचा त्याग करतो, तो त्यालाच प्राप्त होतो—हा सर्वांसाठी सामान्य नियम आहे. (८।५-६) अंतकाळ कोणत्याही समयी येऊ शकतो. असे कोणतेही वर्ष, महीना, दिवस, घंटा (तास), मिनिट, क्षण नाही, ज्यात अंतकाल येऊ शकत नाही. म्हणून मनुष्याने नित्य-निरंतर, सर्व समयी माझे स्मरण करावे—'**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर**'। जो नित्य-निरंतर माझे स्मरण करतो त्याच्यासाठी माझी प्राप्ती सुलभ आहे. (७।१४). कारण जो कोणत्याही समयी शरीराचा त्याग करील तर माझे स्मरण करीतच त्याग करील आणि मलाच प्राप्त होईल.

'**मय्यर्पित मनोबुद्धिः**'—सर्व काळात भगवंताचे स्मरण करण्याने साधकाचे मन-बुद्धी भगवंताना अर्पित होतात. मन-बुद्धी आपली नाही. त्यांच्याशी अपला संबंध नाहीच—अशाप्रकारे मन-बुद्धी याविषयी आपलेपणाचा त्याग केल्याने मन-बुद्धी आपोआप भगवंताला अर्पित होतील. कारण ही भगवंताचीच अपरा-प्रकृती आहे. जरी परा आणि अपरा—दोन्ही प्रकृती भगवंताच्या आहेत तरी परा-प्रकृतीचा संबंध अपरा-प्रकृतीशी नाही, तर केवळ भगवंताशी आहे. कारण ती भगवंताचा अंश आहे—'**ममैवांशो जीवलोके**' (१५।७). म्हणून साधक '**मय्यर्पित मनोबुद्धि**' तेव्हाच होऊ शकतो जेव्हा तो अपराशी आपला संबंध जोडणार नाही. अपराला तिचे मालक असलेल्या भगवंताना अर्पित करावे अर्थात् अपराला आपले आणि आपल्यासाठी कधीही मानू नये.

येथे 'मन' याच्या अंतर्गत चित्ताला आणि 'बुद्धी' च्या अंतर्गत अहंकारालाही समजून घ्यावे. मन-बुद्धी अर्पित झाल्याने भक्त निर्मम आणि निरहंकार होतो.

वास्तविक भक्त स्वतः भगवंताला अर्पित होतो. स्वतः अर्पित झाल्याने मन-बुद्धी इत्यादी सर्वस्व आपोआप अर्पित होतात. सर्वस्व भगवंताला अर्पित झाल्याने सर्वस्व राहत नाही, तर केवळ भगवान् राहतात—'**वासुदेवः सर्वम्**'.

*संबंध—पूर्व श्लोकात सांगितलेल्या अभ्यासजन्य स्मृतीविषयी पुढील श्लोकात वर्णन करीत आहेत.*

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन्॥८॥**

**पार्थ** = हे पृथानंदन! **अभ्यासयोग युक्तेन** = अभ्यासयोगाने युक्त असलेल्या **नान्यगामिना** = (आणि) अन्याचे चिंतन न करणाऱ्या **चेतसा** = चित्ताने **परमम्** = परम **दिव्यम्** = दिव्य **पुरुषम्** = पुरुषाचे **अनुचिन्तयन्** = चिंतन करीत (शरीराचा त्याग करणारा मनुष्य) **याति** = (त्यालाच) प्राप्त होतो.

*व्याख्या*— [सातव्या अध्यायाच्या अठ्ठावीसाव्या श्लोकात जे सगुण-निराकार परमात्म्याचे वर्णन झाले होते त्यालाच या आठव्या, नवव्या आणि दहाव्या श्लोकात विस्ताराने सांगितले गेले आहे.]

**अभ्यासयोगयुक्तेन**—या पदात "अभ्यास" आणि "योग" हे दोन शब्द आलेले आहेत. सांसारातून मन काढून घेऊन परमात्म्यात वारंवार मन लावणे याला "अभ्यास" म्हणतात आणि समतेचे नाव "योग" आहे. "**समत्वं योग उच्यते**" (२।४८) अभ्यासात मन लागल्याने प्रसन्नता होत असते आणि मन न लागल्याने खिन्नता होत असते. हा अभ्यास तर आहे पण "अभ्यास योग" नव्हे. जेव्हा प्रसन्नता आणि खिन्नता दोन्हीही राहत नाहीत, तेव्हाच अभ्यासयोग होत असतो. जरी चित्तामध्ये प्रसन्नता आणि खिन्नता झाली तरी ही, त्याला महत्त्व देऊ नये. केवळ आपल्या उद्देशालाच महत्त्व द्यावे. आपल्या उद्देशावर दृढ राहणेच योग आहे. अशा योगाने युक्त असलेले चित्त असावे.

**चेतसा नान्यगामिना**—चित्त दुसरीकडे जाऊ नये अर्थात् एका परमात्म्याशिवाय दुसरा कोणता उद्देश असू नये.

**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन्**—अशा चित्ताने परम दिव्य पुरुषाचे अर्थात् सगुण-निराकार परमात्म्याचे चिंतन करत शरीराचा त्याग करणारा पुरुष त्याच परमात्म्याला प्राप्त होतो.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने प्रश्न केला होता—'**प्रयाण काले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः**' (८।२). त्या प्रश्नाचे उत्तर देऊन आता आठव्या, नवव्या आणि दहाव्या श्लोकात अंतकाळी स्मरण करणाऱ्यांच्या प्रकाराचे वर्णन करतात.

परमात्म्यात वारंवार मन लावणे 'अभ्यास' आहे आणि कोणत्याही प्रकारची कामना न राहणे चित्तात निरंतर समता राहणे 'अभ्यासयोग' आहे. एका परमात्म्याशिवाय अन्य कोण्याही सत्तेची धारणा न होणे '**नान्यगामिना**' आहे. अन्याची स्वतंत्र सत्ता न राहिल्यामुळे, केवळ एका परमात्म्याचाच उद्देश राहिल्यामुळे साधक परमात्म्यालाच प्राप्त होतो.

*संबंध—आता भगवान् ध्यान करण्यासाठी अत्यंत उपयोगी सगुण-निराकार परमात्म्याच्या स्वरूपाचे वर्णन करतात.*

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात्॥९॥**

**यः** = जो **कविम्** = सर्वज्ञ, **पुराणम्,** = अनादी, **अनुशासितारम्** = सर्वांवर शासन करणारा, **अणोः** = सूक्ष्माहूनही **अणीयांसम्** = अत्यंत सूक्ष्म, **सर्वस्य** = सर्वांचे **धातारम्** = धारण-पोषण करणारा **तमसः** = अज्ञानाहून **परस्तात्** = अत्यंत पलीकडील, **आदित्यवर्णम्** = सूर्याप्रमाणे प्रकाशस्वरूप अर्थात् ज्ञानस्वरूप **अचिन्त्यरूपम्** = अशा अचिन्त्य स्वरूपाचे **अनुस्मरेत्** = चिंतन करतो.

*व्याख्या*— **कविम्**—संपूर्ण प्राण्यांना आणि त्यांच्या शुभाशुभ कर्मांना जाणणारा असल्याने त्या परमात्म्याचे नाव "कवि" अर्थात् सर्वज्ञ आहे.

**पुराणम्**—ते परमात्मा सर्वांचे आदि असल्याने "पुराण" म्हटले जातात.

**अनुशासितारम्**—आपण पाहत असतो ते डोळ्याने पाहत असतो. डोळ्यावर मन शासन करते, मनावर बुद्धी, बुद्धीवर "अहम्" शासन करतो, तसेच जो "अहम्" वरही

जो शासन करतो, जो सर्वांचा आश्रय, प्रकाशक आणि प्रेरक आहे तो (परमात्मा) ''अनुशासिता'' आहे.

दुसरा भाव असा आहे की, जीवांचा कर्म करण्याचा जसा जसा स्वभाव बनलेला आहे त्यानुसारच परमात्मा (वेद, शास्त्र, गुरू, संत इत्यादीच्या द्वारा) कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देतात आणि मनुष्यांचे मागील पाप-पुण्यरूप कर्मानुसार अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती पाठवून त्या मनुष्यांना शुद्ध, निर्मळ बनवितात. अशा प्रकारे मनुष्यांसाठी कर्तव्य-अकर्तव्याचे विधान करणारे आणि मनुष्यांचे पाप-पुण्यरूप मागील कर्मांचा (फल देऊन) नाश करणारे असल्याने परमात्मा ''अनुशासिता'' आहेत.

**अणोरणीयांसम्**—परमात्मा परमाणूपेक्षाही अत्यंत सूक्ष्म आहेत. तात्पर्य परमात्मा मन, बुद्धीचे विषय नाहीत. मन, बुद्धी इत्यादी त्यांना ग्रहण करू शकत नाहीत. मन, बुद्धी तर प्रकृतीचे कार्य असल्यामुळे प्रकृतीलासुद्धा ग्रहण करू शकत नाहीत. मग परमात्मा तर त्या प्रकृतीपेक्षाही अत्यंत सूक्ष्म आहेत. म्हणून ते परमात्मा सूक्ष्मापेक्षाही अत्यंत सूक्ष्म आहेत, अर्थात् सूक्ष्मतेची शेवटची सीमा आहेत.

**सर्वस्य धातारम्**—परमात्मा अनंत कोटी ब्रह्माण्डांना धारण करणारे आहेत, त्यांचे पोषण करणारे आहेत. त्या सर्वांना परमात्म्यापासूनच सत्ता स्फूर्ती मिळत असते. म्हणून ते परमात्मा सर्वांचे धारण-पोषण करणारे म्हटले जातात.

**तमसः परस्तात्**—परमात्मा अज्ञानापासून अत्यंत पलीकडे आहेत, अर्थात् पूर्णपणे अज्ञानरहित आहेत. त्यांचे ठिकाणी लेशमात्रही अज्ञान नसते तर ते अज्ञानाचेही प्रकाशक आहेत.

**आदित्यवर्णम्**—त्या परमात्म्याचा वर्ण सूर्यासारखा आहे, अर्थात् ते सूर्यासारखे सर्वांना, मन, बुद्धी इत्यादींना प्रकाशित करणारे आहेत. त्यांच्यापासूनच सर्वांना प्रकाश मिळतो.

**अचिन्त्यरूपम्**—त्या परमात्म्याचे स्वरूप अचिन्त्य आहे अर्थात् ते मन, बुद्धीच्या चिंतनाचे विषय नाहीत.

**अनुस्मरेत्**—सर्वज्ञ, अनादी, सर्वांचे शासक, परमाणू-पेक्षाही अत्यंत सूक्ष्म, सर्वांचे धारण-पोषण करणारे, अज्ञाना-हून अत्यंत पलीकडे असणाऱ्या आणि सर्वांना प्रकाशित करणाऱ्या, सगुण-निराकार परमात्म्याच्या चिंतनासाठी येथे ''**अनुस्मरेत्**'' पद आले आहे.

येथे ''**अनुस्मरेत्**'' म्हणण्याचे तात्पर्य त्या परमात्म्याला प्राणीमात्राचे ज्ञान आहे, त्यांच्या ज्ञानाच्या बाहेर काहीच नाही अर्थात् त्या परमात्म्याला सर्वांचे स्मरण आहे. आता आपण जर त्या परमात्म्याच्या स्मरणात आहोत तर आपणही त्यांचे स्मरण केले पाहिजे.

येथे शंका अशी येते की, जो अचिन्त्य आहे त्याचे स्मरण कसे करावे ? याचे समाधान असे आहे की ''ते परमात्मतत्त्व चिंतनात येत नाही'' अशी दृढ धारणा करणेच अचिन्त्य परमात्म्याचे चिंतन आहे.

**परिशिष्ट भाव**—परमात्म्याला '**कविम्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, त्याच्या ज्ञानाच्या व्यतिरिक्त काहीही नाही. '**पुराणम्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, तो अनादी आहे, काळाहूनही अतीत अर्थात् काळाचाही प्रकाशक आहे. '**अनुशासितारम्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, सर्व स्वाभाविकच त्याच्या शासनात आहेत. तो जीव आणि जगत्— दोघांचाही शासक आहे—

**क्षरं प्रधानममृताक्षरं हरः क्षरात्मानावीशते देव एकः।** (श्वेताश्वतर० १।१०)

'प्रकृती तर विनाशील आहे आणि तिला भोगणारा जीवात्मा अमृतस्वरूप अविनाशी आहे. या दोन्हींना (विनाशशील आणि अविनाशी यांना) एक ईश्वर आपल्या शासनात ठेवतो.'

'धातारम्' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, तो परमात्मा सर्वांचे पालन-पोषण करणारा आहे. (गीता १५।१७) '**आदित्यवर्णम्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जसे सूर्यात सहज स्वाभाविक नित्य प्रकाश राहतो, तसेच परमात्म्यात सहज स्वाभाविक नित्य ज्ञान, बोध राहतो. तो परमात्मा ज्ञानस्वरूप आहे आणि सर्वांचा प्रकाशक आहे (गीता १३।३३). '**तमसः परस्तात्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, तो परमात्मा अज्ञानाहून अथवा अपराहून अत्यंत पलीकडील आहे—'**यस्मात्क्षरमतीतोऽहम्**' (गीता १५।१८).

***संबंध**—आता अंतकाळच्या चिंतनानुसार गती दाखवितात.*

**प्रयाणकाले मनसाचलेन**
**भक्त्या युक्तो योगबलेन चैव।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्**
**स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥१०॥**

**सः** = तो
**भक्त्या, युक्तः** = भक्तियुक्त मनुष्य
**प्रयाणकाले** = अंतकाळी
**अचलेन** = अचल
**मनसा** = मनाने
**च** = आणि
**योगबलेन** = योगबलाद्वारा
**भ्रुवोः** = भ्रकुटीच्या
**मध्ये** = मध्यभागी
**प्राणम्** = प्राणांना
**सम्यक्** = चांगल्या रीतीने
**आवेश्य** = स्थापन करून
(शरीर सोडल्यावर)
**तम्** = त्या
**परम्** = परम
**दिव्यम्** = दिव्य
**पुरुषम् एव** = पुरुषालाच
**उपैति** = प्राप्त होतो.

*व्याख्या*— **प्रयाणकाले मनसाचलेन....स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्**—येथे भक्तीचा अर्थ प्रियता आहे कारण त्या तत्त्वाविषयी प्रियता (आकर्षण) असल्यानेच मन अचल होत असते. ती भक्ती अर्थात् प्रियता स्व कडून होत असते, मन, बुद्धी इत्यादीकडून नव्हे.

अंतकाळी कवी, पुराण, अनुशासिता इत्यादी विशेषणांनी (मागील श्लोकात) सांगितलेल्या सगुण-निराकार परमात्म्याच्या ठिकाणी भक्तियुक्त मनुष्याचे मन स्थिर होणे अर्थात् सगुण-निराकार स्वरूपाविषयी आदरपूर्वक दृढ होणेच मनाचे अचल होणे आहे.

प्रथम प्राणायामद्वारा प्राणांना रोखण्याचा जो अधिकार प्राप्त केला आहे त्याला "योगबल" म्हणतात. त्या योगबला-द्वारा दोन्ही भुवयांच्या मध्यभागी स्थित असलेले जे द्विदल चक्र आहे, त्यात स्थित असलेल्या सुषुम्ना नाडीत प्राणांचा उत्तम तऱ्हेने प्रवेश करून तो (दहाव्या द्वाराने शरीराला सोडून) दिव्य परम पुरुषाला प्राप्त होत असतो.

**तं परं पुरुषमुपैति दिव्यम्**—या पदांचे तात्पर्य ज्या परमात्मतत्त्वाचे मागील (नवव्या) श्लोकात वर्णन झाले आहे त्याच दिव्य परम सगुण-निराकार परमात्म्याला तो प्राप्त होतो.

आठव्या श्लोकात जी गोष्ट सांगितली गेली होती, तिलाच नवव्या आणि दहाव्या श्लोकात विस्ताराने सांगून या तीन श्लोकांच्या प्रकरणाचा उपसंहार केला गेला आहे.

या प्रकरणात सगुण—निराकार परमात्म्याच्या उपासनेचे वर्णन आहे. या उपासनेत अभ्यासाची आवश्यकता आहे. प्राणायामपूर्वक मनाला त्या परमात्म्यात लावण्याचे नाव अभ्यास आहे. हा अभ्यास अणिमा, महिमा इत्यादी सिद्धी प्राप्त करण्यासाठी नव्हे तर केवळ परमात्मतत्त्व प्राप्त करण्यासाठी होय. असा अभ्यास करत असताना प्राण आणि मनावर असा अधिकार प्राप्त करून घ्यावा की, वाटेल तेव्हा प्राणाला रोखता यावे आणि मनाला वाटेल तेव्हा, तसेच वाटेल त्या ठिकाणी लावता यावे. जो असा अधिकार प्राप्त करून घेतो तोच अंतकाळी प्राणांना सुषुम्ना नाडीत प्रविष्ट करू शकतो. कारण जर अभ्यासकाळातही मनाला संसारा-तून काढून परमात्म्याकडे लावण्यात साधकाला कठीणतेचा, असमर्थतेचा अनुभव येतो तर अंतकाळसारख्या कठीण काळात मनाला लावणे सामान्य मनुष्याचे काम नव्हे. ज्या-च्या जवळ पूर्वीपासूनच योगबल आहे तोच अंतसमयी मनाला परमात्म्यात लावू शकतो आणि प्राणांचा सुषुम्ना नाडीत प्रवेश करवू शकतो.

साधकाने प्रथम हा निश्चय करावा की, आज्ञानापासून अत्यंत पलीकडे असलेले, सर्वांपेक्षा अतीत जे परमात्मतत्त्व आहे, ते सर्वांचे प्रकाशक, सर्वांचा आधार आणि सर्वांना सत्ता स्फूर्ती देणारे निर्विकार तत्त्व आहे. त्या तत्त्वाविषयीच प्रियता झाली पाहिजे, मनाचे आकर्षण झाले पाहिजे मग त्याचे ठिकाणी स्वाभाविकच मन लागेल.

**परिशिष्ट भाव—'भक्त्या युक्तः'** याचे तात्पर्य हे आहे की, संसाराची आसक्ती समाप्त झाल्यामुळे त्या साधकाचे एका परमात्म्यातच आकर्षण राहते, ईतरात आकर्षण राहत नाही. संसारी माणसे तर अपरामध्ये आकृष्ट राहतात, परंतु जो अपराचा त्याग करून भगवंतात आकृष्ट होतो, तो भक्त होतो. संसारी माणसे शरीर-संसारात आसक्त असल्यामुळे 'विभक्त' अर्थात् भगवंतापासून वेगळे होतात, परंतु भगवंतात लागलेला साधक विभक्त राहत नाही तर 'भक्त' अर्थात् भगवंताशी एक (अभिन्न) होतो.

**'योग बलेन'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, पूर्वी केलेल्या योगाभ्यासामुळे अंतकाळी होणारी अशक्त अवस्था त्याला बाधा पोहचवू शकत नाही, त्याच्यात कोणताही विकार उत्पन्न करू शकत नाही, प्राणायाम इत्यादीचे बल 'योगबल' आहे.

***संबंध**—आता भगवान् पुढच्या श्लोकात निर्गुण-निराकाराच्या प्राप्तीच्या उपायांचा उपक्रम करतात.*

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं सङ्ग्रहेण प्रवक्ष्ये॥ ११॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वेदविदः** | = वेद जाणणारे लोक | **यत्** | = ज्याला | **चरन्ति** | = पालन करतात, |
| **यत्** | = ज्याला | **विशन्ति** | = प्राप्त करतात (आणि) | **तत्** | = ते |
| **अक्षरम्** | = अक्षर | **यत्** | = (साधक) ज्याच्या प्राप्तीची | **पदम्** | = पद (मी) |
| **वदन्ति** | = म्हणतात, | | | **ते** | = तुला |
| **वीतरागाः** | = आसक्तिरहित | **इच्छन्तः** | = इच्छा करीत | **सङ्ग्रहेण** | = संक्षेपाने |
| **यतयः** | = महात्मालोक | **ब्रह्मचर्यम्** | = ब्रह्मचर्याचे | **प्रवक्ष्ये** | = सांगेन. |

***व्याख्या***— [सातव्या अध्यायाच्या एकोणतीसाव्या श्लोकात जे निर्गुण-निराकार परमात्म्याचे वर्णन झाले होते त्यालाच येथे अकराव्या, बाराव्या आणि तेराव्या श्लोकात विस्ताराने म्हटले गेले आहे]

**यदक्षरं वेदविदो वदन्ति**—वेदांना जाणणारे पुरुष ज्याला अक्षर, निर्गुण, निराकार म्हणतात, ज्याचा कधी नाश होत नाही, जो सदा-सर्वदा एकरूप, एकरस राहत असतो आणि ज्याला याच अध्यायात तीसऱ्या श्लोकात "**अक्षरं ब्रह्म परमम्**" म्हटले गेले आहे, त्याच निर्गुण-निराकार तत्त्वाचे येथे "अक्षर" नावाने वर्णन झाले आहे.

**विशन्ति यद्यतयो वीतरागाः**—ज्यांच्या अंत:करणात आसक्तीचा अत्यंत अभाव झाला आहे, म्हणून ज्यांचे अंत:-करण अत्यंत निर्मळ आहे आणि ज्यांच्या हृदयात सर्वोपरी अद्वितीय परमतत्त्वाला प्राप्त करण्याची उत्कट अभिलाषा निर्माण झालेली असते, असे प्रयत्नशील संन्यासी महापुरुष त्या तत्त्वात प्रवेश करतात—त्याला प्राप्त करतात.

**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति**—ज्यांचा उद्देश केवळ परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीचा आहे, परमात्मप्राप्तीशिवाय ज्यांचे इतर कोणते ध्येय नाहीच आणि जे परमात्मप्राप्तीची इच्छा ठेवून ब्रह्मचर्याचे पालन करतात, संपूर्ण इंद्रियांचा संयम करतात अर्थात् कोणत्याही विषयाचे भोगबुद्धीने सेवन करत नाहीत.

**तत्ते पदं सङ्ग्रहेण प्रवक्ष्ये**—जे संपूर्ण साधनांच्या शेवटचे फल आहे, त्या पदाला अर्थात् तत्त्वाला मी तुला संक्षेपाने आणि उत्तम रीतीने सांगेन. संक्षेपाने म्हणण्याचे तात्पर्य शास्त्रांत ज्या तत्त्वाला सर्वोपरी विलक्षण म्हटले गेले आहे, प्रत्येक मनुष्य त्याला प्राप्त करू शकत नाही—असा ज्याचा महिमा सांगितला गेला आहे ते पद (तत्त्व) कशा रीतीने प्राप्त होते—ही गोष्ट मी सांगेन. चांगल्या रीतीने म्हणण्याचे तात्पर्य, ब्रह्माची उपासना करणारे ज्या रीतीने त्या ब्रह्माला प्राप्त होतात ते मी उत्तम प्रकारे सांगेन.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात गौणतेने चारी आश्रमांचे वर्णन घेऊ शकतो. जसे—'**यदक्षरं वेदविदो वदन्ति**' पदांनी गृहस्थाश्रमाचा संकेत आहे. कारण वेदांचे अध्ययन करणे ब्राह्मणाचे खास काम आहे. '**विशन्ति यद्यतयो वीतरागाः**' पदांनी संन्यास आणि वानप्रस्थाश्रम यांचे विषयी संकेत आहे. '**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति**' पदांनी ब्रह्मचर्याश्रमा विषयीचा संकेत आहे.

मुक्ती सर्वच वर्णात, आश्रमात होऊ शकते. म्हणून भगवंताने आश्रमांचे स्पष्टरूपाने वर्णन केले नाही आणि वर्णांचे स्पष्टरूपाने वर्णनही कर्तव्य-पालनाच्या दृष्टीने केले आहे. अर्जुन क्षत्रिय होते आणि ते स्वत:च्या युद्धरूप कर्तव्याचा त्याग करू इच्छित होते. म्हणून भगवंताने त्यांना आपल्या कर्तव्यात लावण्याच्या उद्देशाने वर्णधर्माचे वर्णन केले. युद्ध करणे वर्णधर्म आहे आश्रमधर्म नाही.

***संबंध**—अंतकाळी त्या निर्गुण-निराकार तत्त्वाच्या प्राप्तीचा विधी फलासह सांगण्यासाठी पुढील दोन श्लोक सांगत आहेत.*

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम्॥ १२॥**
**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वद्वाराणि** | = (इंद्रियांच्या) संपूर्ण द्वारांना | **हृदि** | = हृदयात | **प्राणम्** | = प्राणांना |
| | | **निरुध्य** | = निरोध करून | **मूर्ध्नि** | = मस्तकात |
| **संयम्य** | = बंद करून | **च** | = आणि | **आधाय** | = स्थापित करून |
| **मनः** | = मनाचा | **आत्मनः** | = आपल्या | **योग धारणाम्** | = योगधारणेत |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आस्थितः** | = सम्यक् प्रकाराने स्थित होऊन | **ब्रह्म** | = ब्रह्माचे | **त्यजन्** | = सोडून |
| **यः** | = जो साधक | **व्याहरन्** | = (मानसिक) उच्चारण (आणि) | **प्रयाति** | = जातो |
| **ओम्** | = 'ॐ' | **माम्** | = माझे | **सः** | = तो |
| **इति** | = या | **अनुस्मरण** | = स्मरण करीत | **पराम्** | = परम |
| **एकाक्षरम्** | = एक अक्षर | **देहम्** | = शरीराला | **गतिम्** | = गतीला |
| | | | | **याति** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— **सर्वद्वाराणि संयम्य**—(अंतसमयी) संपूर्ण इंद्रियद्वारांचा संयम करून घ्यावा अर्थात् शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—या पाचही विषयापासून क्रमाने श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि नासिका या पाच इंद्रियांना तसेच बोलणे, ग्रहण करणे, गमन करणे, मूत्र-त्याग आणि मल-त्याग या पाचही क्रियापासून क्रमाने वाणी, हात, चरण, उपस्थ आणि गुदा त्या पाच कर्मेद्रियांचा संपूर्णपणे निरोध करावा म्हणजे इंद्रिये आपापल्या स्थानात राहतील.

**मनो हृदि निरुध्य च**—मनाचा हृदयातच निरोध करावा अर्थात् मनाला विषयाकडे जाऊ देऊ नये ज्यामुळे मन आपल्या स्थानात (हृदयात) राहील.

**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणम्**—प्राणाला मस्तकात धारण करावे अर्थात् प्राणावर आपला अधिकार प्राप्त करून दहाव्या द्वारात ब्रह्मरन्ध्रात प्राणाला रोखून धरावे.

**आस्थितो योगधारणाम्**—अशा प्रकारे योग धारणेत स्थित व्हावे. इंद्रियांनी कोणतीही क्रिया करू नये, मनानेही संकल्प-विकल्प करू नये आणि प्राणावर पूर्ण अधिकार प्राप्त करणे हेच योगधारणेत स्थित होणे आहे.

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्**—यानंतर एक अक्षर ब्रह्म "ॐ" (प्रणव) चा मानसिक उच्चार करावा आणि माझे अर्थात् निर्गुण-निराकार परम अक्षर ब्रह्माचे (ज्याचे वर्णन याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात झाले आहे) स्मरण करावे. *सर्व देश, काल, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीत एक सच्चिदानंदघन परमात्माच सत्तारूपाने परिपूर्ण आहे—अशी धारणा करणे हेच माझे स्मरण आहे.

**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्**—उपर्युक्त प्रकाराने निर्गुण-निराकाराचे स्मरण करत जो देहत्याग करतो अर्थात् दहाव्या द्वारातून प्राणाला बाहेर काढतो तो परम-गतीला अर्थात् निर्गुण-निराकार परमात्म्याला प्राप्त होतो.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात योगाभ्यास करणाऱ्या अद्वैतवादीचे वर्णन आहे. '**व्याहरन्**' पदाने मानसिक उच्चारण समजावे. कारण मनाचा हृदयात निरोध केल्यावर आणि प्राणांना मस्तकात स्थापित केल्यावर वाचिक उच्चारण होणे असंभव आहे.

***संबंध***—*ज्याचेजवळ योगबल असते आणि ज्याचा प्राणावर अधिकार असतो, त्याला तर निर्गुण-निराकाराची प्राप्ती होते परंतु या दोन्ही गोष्टी दीर्घकालीन अभ्यासाने साध्य असल्याकारणाने सर्वांसाठी कठीण आहेत. म्हणून भगवान् पुढील श्लोकात आपली अर्थात् सगुण-साकाराची सुगमतेने होणारी प्राप्ती सांगतात.*

## अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः।
## तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः॥ १४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **सततम्** | = निरंतर | **योगिनः** | = योग्यासाठी |
| **अनन्यचेताः** | = अनन्यचित्ताचा | **स्मरति** | = स्मरण करतो | **अहम्** | = मी |
| **यः** | = जो मनुष्य | **तस्य** | = त्या | **सुलभः** | = सुलभ आहे अर्थात् त्याला सुलभतेने प्राप्त होतो. |
| **माम्** | = माझे | **नित्ययुक्तस्य** | = नित्य-निरंतर माझ्यात लागलेल्या | | |
| **नित्यशः** | = नित्य- | | | | |

*व्याख्या*—[सातव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात जे सगुण-साकार परमात्म्याचे वर्णन झाले होते, त्यालाच या चौदाव्या, पंधराव्या आणि सोळाव्या श्लोकात विस्ताराने सांगितले गेले आहे.]

**अनन्यचेताः**—ज्याचे चित्त भगवंताला सोडून कोणत्याही भोगभूमीकडे, कोणत्याही ऐश्वर्याकडे किंचित्मात्रही जात नाही. ज्याच्या अंतःकरणात भगवंताशिवाय इतर कोणाचा कसलाही आश्रय नसतो, महत्त्व नसते, तो पुरुष

* समग्ररूपाचे प्रकरण असल्याने येथे "माम्" शब्दाने निर्गुण-निराकाराचे चिंतन घेतले गेले आहे.

अनन्य चित्त असणारा असतो. जसे पतिव्रता स्त्रीचे पती हेच व्रत, नियम असते. पतीशिवाय तिच्या मनात कोण्याही पुरुषाचे आसक्तिपूर्वक चिंतन होतच नसते. शिष्य गुरूचा आणि सुपुत्र माता-पित्याचा परायण असतो. त्यांचे इष्ट दुसरे कोणतेही नसते. त्याचप्रमाणे भक्त भगवंताशीच परायण राहत असतो.

येथे "**अनन्यचेताः**" पद सगुण-उपासना करणाऱ्याचे वाचक आहे. सगुण उपासनेत विष्णू, राम, कृष्ण, शिव, शक्ती, गणेश, सूर्य इत्यादी जी भगवंताची स्वरूपे आहेत, त्यापैकी जो ज्या स्वरूपाची उपासना करतो, त्याच स्वरूपाचे चिंतन व्हावे. परंतु दुसऱ्या स्वरूपांना आपल्या इष्टापासून वेगळे समजू नये आणि स्वतः आपल्यालाही आपल्या इष्टाशिवाय इतर कोणाचे समजू नये, म्हणजे त्याचे इतरांकडे मन जाणार नाही. तात्पर्य "मी केवळ भगवंताचा आहे आणि भगवानच माझे आहेत, माझे दुसरे कोणी नाही आणि मी दुसऱ्या कोणाचा नाही" असा भाव झाल्यास तो "**अनन्य चेताः**" होत असतो.

**सततं यो मां स्मरति नित्यशः—"सततम्"** चा अर्थ निरंतर होतो अर्थात् झोपेतून उठल्यापासून पुन्हा गाढ झोप लागेपर्यंत जो माझे स्मरण करत असतो आणि "नित्यशः" चा अर्थ सदा, अर्थात् या गोष्टीला ज्या दिवसापासून पकडले त्या दिवसापासून नियमितपणे थेट मृत्यूपर्यंत जो माझे स्मरण करत असतो.

**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः**—अशा नित्ययुक्त योग्यासाठी मी सुलभ आहे. येथे "नित्ययुक्त" पद चित्ताद्वारा निरंतर चिंतन करणाऱ्याचे वाचक नाही तर, श्रद्धा-प्रेमपूर्वक निष्कामभावाने भगवंताविषयी स्वतः आकृष्ट होणाऱ्याचे वाचक आहे. जसा एखादा ब्राह्मण आपल्या ब्राह्मणत्वात स्थित राहत असतो की "मी ब्राह्मण आहे, क्षत्रिय, वैश्य इत्यादी नाही" तो आपल्या ब्राह्मणत्वाचे स्मरण करो अथवा न करो, त्याच्या ब्राह्मणत्वात कसलाही फरक पडत नाही. त्याचप्रमाणे "मी भगवंताचा आहे आणि भगवान माझे आहेत." या नित्य संबंधात दृढ राहणाराच नित्ययुक्त आहे. अशा नित्ययुक्त योग्याला भगवान् सुलभतेने प्राप्त होतात.

भगवंताशिवाय शरीर, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी आपले नव्हेत, केवळ भगवंतच आपले आहेत—असे दृढतेने मानल्यास भगवान् सुलभ होतात. परंतु शरीर इत्यादींना आपले मानत राहिल्याने भगवान् सुलभ होत नाहीत.

भगवंताशी आपली भिन्नता तसेच संसाराशी आपली एकता कधी झाली नाही, होणार नाही आणि होऊ शकत-ही नाही. अशा रीतीने मनुष्याची भगवंताशी स्वतः स्वाभाविक अभिन्नता असते, संसाराशी स्वतः स्वाभाविक भिन्नता असते. परंतु अज्ञानाने मनुष्य आपल्याला भगवंतापासून आणि भगवंताला आपल्यापासून वेगळा समजतो तसेच आपल्याला शरीराचा आणि शरीराला आपले मानतो. या विपरीत धारणेमुळेच हा मनुष्य जन्म-मरणाच्या चक्रात फिरत राहतो. जेव्हा ही विपरीत धारणा संपूर्णपणे नष्ट होते तेव्हा भगवान् स्वतः सुलभ होतात.

आठव्यापासून तेराव्या श्लोकापर्यंत सगुण-निराकार आणि निर्गुण-निराकाराचे स्मरण सांगण्यात आले. या दोन्ही स्मरणात प्राणायामाची मुख्यता राहत असते, जी सिद्ध करणे कठीण आहे. अंतकाळासारख्या बिकट अवस्थेतही प्राणायामाच्या बलाने प्राणाला भुवयांच्या मध्यभागी स्थापित करू शकेल, अथवा मूर्धेत (दशम द्वारात) लावू शकेल, असा प्राणावर अधिकार असणे आवश्यक आहे. परंतु भगवंताच्या स्मरणात ही कठीणता नसते, कारण येथे प्राणांचा संबंध नाही. येथे तर भगवंताशी साधकाचा (स्व चा) अनादि- कालापासून स्वतःसिद्ध संबंध आहे. या संबंधात इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण इत्यादीचीही जरूरी नाही. जसे एखाद्या वस्तुचा वीमा उतरलेला असल्यावर, वस्तूच्या बिघडणे, तुटणे-फुटणे याची चिंता राहत नाही. तसेच शरीर, इंद्रिये, मन, बुद्धिसहित स्वतः आपल्याला भगवंताला समर्पित केल्यावर साधकाला आपल्या गतीविषयी कधी किंचित्मात्रही चिंता राहत नसते. कारण हे साधन क्रियाजन्य अथवा अभ्यासजन्य नव्हे. यात तर केवळ संबंधाची जागृती असते. म्हणून या साधनेत काठिण्य अजिबात नसते. याच कारणामुळे भगवंतांनी स्वतः आपल्याला सुलभ म्हटले आहे.

**परिशिष्ट भाव—'अनन्यचेताः'**—भक्ताच्या दृष्टीत एका परमात्म्याशिवाय दुसऱ्याची सत्ता नसल्यामुळे त्याचे मन दुसऱ्या ठिकाणी कसे जाईल? का जाईल? कोठे जाईल? म्हणून तो स्वतः अनन्य चित्तवाला होतो.

**'सततं यो मां स्मरति नित्यशः'**—एक 'करणे' असते आणि एक 'होणे' असते. जे केले जाते ती क्रिया आहे आणि जे आपोआप होते ते स्मरण आहे. जसे गीतेच्या शेवटी अर्जुनाने म्हटले—'**स्मृतिर्लब्धा**' (१८।७३) तर ही स्मृती क्रिया नव्हे तर भगवंताशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाची आपोआप होणारी स्मृती आहे. भगवंताच्या स्मरणात खास हेतू त्यांच्याविषयी आत्मीयता आहे. भगवंतच माझे आहेत आणि माझ्यासाठी आहेत—अशाप्रकारे भगवंतात आत्मीयता झाल्यामुळे आपोआप भगवंताविषयी प्रेम निर्माण होते आणि ज्याच्याविषयी प्रेम होते त्याचे स्मरण आपोआप आणि नित्य-निरंतर होते.

म्हणून भगवंताने सातव्या अध्यायाच्या आरंभी '**मय्यासक्तमनाः**' पदाने आपल्यात आसक्ती अर्थात् प्रेम निर्माण होण्याबद्दल म्हटले आहे. तात्पर्य हे आहे की, केवळ भगवंतानाच आपले आणि आपल्यासाठी मानल्याने साधकाची भगवंतात प्रियता होते. भगवंतात प्रियता झाल्यावर मग भगवंताचे स्मरण आपोआप होते.

'**नित्ययुक्तस्य**'—नित्य-निरंतर भगवंताशी संबंध जडला असल्यामुळे भक्ताला '**नित्ययुक्त**' म्हटले गेले आहे. सातव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात '**तेषां ज्ञानी नित्ययुक्तः**' पदांनीही हीच गोष्ट सांगितली गेली आहे. '**नित्ययुक्तस्य**' पदाने श्लोकाच्या पूर्वार्धात आलेल्या सर्व गोष्टींचा संक्षेप होतो.

'**तस्याहं सुलभः पार्थ**'—भगवंताने महात्मा याला तर दुर्लभ म्हटले आहे—'**स महात्मा सुदुर्लभः**' (गीता ७। १९). परंतु येथे स्वतःला सुलभ म्हटले आहे! याचे तात्पर्य असे आहे की, संसारात भगवान् दुर्लभ नाहीत, तर त्यांचे तत्त्व जाणून त्यांना शरण होणारे भक्त दुर्लभ आहेत. कारण भगवंताला शोधले तर ते सर्व ठिकाणी प्राप्त होतील, परंतु भगवंताचा आवडता भक्त कुठे-कुठेच सापडेल—

**हरि दुरलभ नहिं जगतमें, हरिजन दुरलभ होय।**
**हरि हेर्‍याँ सब जग मिलै, हरिजन कहिं एक होय॥**

भगवान् कृपा करून जे मनुष्यशरीर प्रदान करतात, त्या शरीराद्वारा जीव अनेक योनीत आणि नरकातही जाऊ शकतो. परंतु भक्त कृपा करून भगवंताचीच प्राप्ती करवितो—

**हरि से तू जनि हेत कर, कर हरिजन से हेत।**
**हरि रीझै जग देत हैं, हरिजन हरि ही देत॥**

वास्तविक जे नित्यप्राप्त आहे त्यात सुलभता-दुर्लभता म्हणताच येत नाही. परंतु लोकांनी त्याला दुर्लभ (कठीण) मानले आहे. या वृत्तीला हटविण्यासाठी भगवंताने स्वतःला सुलभ सांगितले आहे. ज्याची स्वतःची सत्ताच नाही त्या असत्‌ला (शरीर-संसाराला) सत्ता आणि महत्त्व दिल्याने आणि त्याच्याशी संबंध जोडल्यामुळेच नित्यप्राप्त परमात्मा दुर्लभ होत आहेत. असत्‌ला सत्ता आणि महत्ता दिली नाही तर परमात्म्याची प्राप्ती आपोआप सिद्ध आहे. असत् हे आहे आणि ते आपले आणि आपल्यासाठी आहे—असे मानणे हेच असत्‌ला सत्ता आणि महत्ता देऊन त्याच्याशी संबंध जोडणे आहे.

***संबंध***—*आता दोन श्लोकांत भगवंत आपल्या प्राप्तीचे माहात्म्य सांगतात.*

## मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम्।
## नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः॥ १५॥

**महात्मानः** = महात्मालोक
**माम्** = मला
**उपेत्य** = प्राप्त करून
**दुःखालयम्** = दुःखालय अर्थात् दुःखाचे स्थान (आणि)
**अशाश्वतम्** = अशाश्वत अर्थात् निरंतर बदलणाऱ्या
**पुनर्जन्म** = पुनर्जन्माला
**न, आप्नुवन्ति** = प्राप्त होत नाहीत; (कारण ते)
**परमाम्** = परम
**संसिद्धिम्** = सिद्धिला
**गताः** = प्राप्त झाले आहेत अर्थात् त्यांना परमप्रेमाची प्राप्ती झाली आहे.

*व्याख्या*—**मामुपेत्य पुनर्जन्म....संसिद्धिं परमां गताः**— "**मामुपेत्य**" चे तात्पर्य भगवद्दर्शन करून घ्यावे, तत्त्वाने जाणून घ्यावे, अथवा भगवंतात प्रविष्ट होऊन जावे, तर मग पुनर्जन्म होत नाही. पुनर्जन्माचा अर्थ, पुनः शरीर धारण करणे असा आहे. ते शरीर मग मनुष्याचे असो अथवा पशु-पक्षी इत्यादी एखाद्या प्राण्याचे असो परंतु ते धारण करण्यात दुःखच दुःख असते. म्हणून पुनर्जन्माला दुःखालय अर्थात् दुःखाचे घर म्हटले गेले आहे.

मृत्यूनंतर हा प्राणी आपल्या कर्मानुसार ज्या योनीत जन्म घेतो त्यावेळी जन्मकाळी गर्भवेष्टनातून बाहेर पडताना शरीराची चामडी सोलल्याप्रमाणे कष्ट होतात. परंतु त्यावेळी तो आपले कष्ट, दुःख कोणाला सांगू शकत नाही कारण तो त्या अवस्थेत भयंकर असमर्थ असतो. जन्मानंतर बालक पूर्णपणे परतंत्र असते. कोणतेही कष्ट झाले तर ते रडत असते परंतु दुःख सांगू शकत नाही. थोडे मोठे झाल्यावर त्याला खाण्या-पिण्याच्या वस्तू, खेळणी इत्यादीची इच्छा होत असते आणि त्यांची पूर्ती नाही झाली तर त्याला फार दुःख होत असते. शिकताना शाळेत नियमाच्या बंधनात रहावे लागते.

रात्र-रात्र जागून अभ्यास करावा लागतो, त्यामुळे कष्ट होतात. शिकलेली विद्या विसरून जाते आणि शिक्षकाने विचारल्यावर उत्तर आले नाही तर दुःख होत असते. आपसातील ईर्ष्या, द्वेष, मत्सर, अभिमान इत्यादीमुळे अंतःकरण जळत असते. परीक्षेत अनुत्तीर्ण झाल्यास मूर्खपणाने इतके दुःख होते की, कित्येक तर त्यापायी आत्महत्यासुद्धा करून घेतात.

तरुण झाल्यावर आपल्या इच्छेप्रमाणे विवाह इत्यादी न झाल्यास दुःख होत असते. विवाह झाल्यावर पत्नी अथवा पती अनुकूल न मिळाल्याने दुःख होत असते. मुले-बाळे होतात तर त्यांचे पालन-पोषण करण्यात कष्ट होतात. मुली मोठ्या झाल्या आणि त्यांचे लग्न लवकर न झाले तर माता-पित्याची झोप उडून जाते. खाणे-पिणे गोड लागत नाही. सतत बेचैनी राहते.

वृद्धावस्था आल्यावर शरीरात असमर्थता येत असते. अनेक प्रकारचे रोग सवार होतात. सुखाने उठणे-बसणे, चालणे-फिरणे, खाणे-पिणे इत्यादीसुद्धा कठीण होते. घरच्या माणसांकडून तिरस्कार होऊ लागतो. त्यांचे बरे वाईट बोलणे ऐकावे लागते. रात्री खोकला जोर करतो. झोप येत नाही. मृत्यूसमयीही भयंकर कष्ट होतात. असे दुःख किती म्हणून सांगावे ? त्यांचा काही अंतच नसतो.

मनुष्यासारखेच कष्ट पशु-पक्षी इत्यादीनाही होतात. त्यांना शीत-उष्ण, वर्षा-हवा इत्यादीपासून कष्ट होत असतात. पुष्कळशी जंगली जनावरे त्यांच्या लहान बालकाला खाऊन टाकतात, त्यावेळी त्या बालकाला भयंकर दुःख होते. अशा प्रकारे सर्वच योनीत अनेक प्रकारचे दुःख होत असते. याच-प्रमाणे नरकांत आणि चौऱ्यांशी लाख योनीत दुःख भोगावे लागते. म्हणून पुनर्जन्माला ''दुःखालय'' म्हटले आहे.

पुनर्जन्माला ''अशाश्वत'' म्हणण्याचे तात्पर्य, कोणताही पुनर्जन्म (शरीर) निरंतर राहत नाही. त्यात नेहमी परिवर्तन होत राहते. कुठेही कोणत्याही योनीत स्थायी राहता येत नाही. थोडे सुख मिळत असले तरी ते टिकत नाही आणि शरीराचाही अंत होऊन जातो. नवव्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात याच पुनर्जन्माला मृत्यूची वाट म्हटले आहे ''**मृत्युसंसारवर्त्मनि**''

येथे भगवंताला ''माझी प्राप्ती झाल्यावर पुनर्जन्म होत नाही'' इतकेच म्हणणे पर्याप्त होते. तरीही पुनर्जन्माबरोबर ''दुःखालय'' आणि ''अशाश्वत'' ही दोन विशेषणे का दिली गेली ? ही दोन विशेषणे दिल्याने हा एक भाव निघतो की, जसे भगवान् भक्तजनांचे पालन, दुष्टांचा नाश आणि धर्माची स्थापना यासाठी पृथ्वीवर अवतार घेतात. तसेच भगवंताला प्राप्त झालेले भक्तलोकही साधू पुरुषांचे रक्षण, दुष्टांची सेवा, आणि धर्माचे उत्तम तऱ्हेने पालन करवून घेण्यासाठी आणि स्वतः करण्यासाठी कारक पुरुषाच्या रूपांत, संत पुरुषाच्या रूपात, या पृथ्वीवर जन्म घेऊ शकतात. *अथवा भगवान् जेव्हा अवतार घेतात तेव्हा त्यांच्याबरोबर पार्षदाच्या रुपातही (गोपाळाप्रमाणे) ते भक्तजन पृथ्वीवर जन्म घेऊ शकतात. परंतु त्या भक्तांचा हा जन्म दुःखालय आणि अशाश्वत नसतो. कारण त्यांचा जन्म कर्मजन्य नसतो तर भगवदिच्छेने होत असतो.

जे आरंभापासूनच भक्तिमार्गाची वाटचाल करतात त्या साधकांनाही भगवंतांनी ''महात्मा'' म्हटले आहे (९।१३) जे भगवत्तत्त्वाशी अभिन्न होतात त्यांनाही ''महात्मा'' म्हटले आहे (७।१९) आणि जे वास्तविक प्रेमाला प्राप्त होतात, त्यांना ही ''महात्मा'' म्हटले आहे. (८।१५) तात्पर्य असत् शरीर-संसाराशी संबंध झाल्याने माणसे ''अल्पात्मा'' होत असतात कारण ते शरीर-संसाराच्या आश्रित राहतात. आपल्या स्वरूपात स्थित झाल्यावर ते ''आत्मा'' होतात. कारण त्यांचे ठिकाणी अणूरूपाने ''अहम्'' चा गंध राहण्याची शक्यता असते. भगवंताशी अभिन्न झाल्यावर ते ''महात्मा'' होतात. कारण ते भगवन्निष्ठ असतात. त्यांची स्वतःची कोणती स्वतंत्र स्थिती नसते.

भगवंतांनी गीतेत कर्मयोग, ज्ञानयोग इत्यादी योगांत ''महात्मा'' शब्दाचा प्रयोग केला नाही. केवळ भक्तियोगातच भगवंतांनी ''महात्मा'' शब्दाचा प्रयोग केला आहे. यावरुन सिद्ध होते की, गीतेत भगवान् भक्तीलाच सर्वोपरी मानतात.

महात्म्यांचे पुनर्जन्माला प्राप्त न होण्याचे कारण हे आहे की, ते परमसिद्धीला अर्थात् परमप्रेमाला प्राप्त झालेले असतात—''**संसिद्धिं** †**परमां गताः**'' जसे लोभी व्यक्तिला जितके धन मिळते, तितके त्याला थोडे वाटते आणि त्याची धनाची भूक वरचेवर वाढत जाते. तसेच आपल्या अंशी भगवंताला ओळखल्यावर भक्तात प्रेमाची भूक वाढतच राहते. त्याला प्रत्येक क्षणाला वर्धमान, असीम, अगाध, अनंत प्रेमाची प्राप्ती होत असते. हे प्रेम भक्तीची अंतिम सिद्धी

* संतांनी म्हटले आहे—

परित्राणाय साधूनां सेवां कर्तुं च दुष्कृताम्। धर्म सम्पालनार्थाय सम्भवन्ति कलौ युगे॥

† येथे ''सिद्धि'' शब्दा बरोबर ''सम्'' उपसर्ग आणि ''परमाम्'' विशेषण देण्याचे तात्पर्य यापेक्षा श्रेष्ठ कोणतीही सिद्धी नाही. कारण जीव भगवंताचा अंश आहे आणि जेव्हा तो संपूर्णपणे भगवंताला समर्पित होतो तेव्हा कोणतीही सिद्धी शिल्लक राहत नाही.

असते. यासारखी दुसरी कोणती सिद्धी नाहीच.

**विशेष गोष्ट**

गीतेचे अध्ययन केल्याने असे कळून येते की, भगवंतांनी गीतेत आपल्या भक्तीचा महिमा फार विशेषत्वाने गायिला आहे. भगवंतांनी भक्ताला संपूर्ण योग्यांमध्ये युक्ततम (सर्वात श्रेष्ठ) म्हटले आहे (६।४७) आणि स्वतः आपल्याला भक्तासाठी सुलभ म्हटले आहे (८।१४) परंतु आपल्या आग्रहाचा त्याग क रून कोणत्याही साधकाने केवळ कर्मयोग, केवळ ज्ञानयोग अथवा केवळ भक्तियोगाचे अनुष्ठान केले, तर शेवटी ते एकाच तत्त्वाला प्राप्त होतात. याचें कारण हे आहे की, साधकांच्या दृष्टीत तर कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—हे तीन भेद आहेत परंतु साध्य तत्त्व एकच आहे. साध्य तत्त्वात भिन्नता नाही. परंतु यात एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे की, ज्या दर्शनात ईश्वर, भगवान्, परमात्मा सर्वोपरी आहेत अशी मान्यता नसते, त्या दर्शनानुसार अनुष्ठान करणारे असत्‌शी संपूर्णपणे संबंध-विच्छेद करून मुक्त तर होतात; परंतु आपल्या अंशीच्या स्वीकृतीशिवाय त्यांना परमप्रेमाची प्राप्ती होत नाही आणि परमप्रेमाची प्राप्ती झाल्याशिवाय त्यांना प्रतिक्षण वर्धमान आनंद मिळत नसतो. त्या आनंदाला, प्रेमाला प्राप्त होणेच या ठिकाणी परमसिद्धीला प्राप्त होणे आहे.

**परिशिष्ट भाव**—गीतेच्या सातव्या अध्यायात तर संसाराला परमात्म्याचे स्वरूप म्हटले गेले आहे—**'वासुदेवः सर्वम्'** (७। १९). परंतु येथे त्याला दुःखालय अर्थात् दुःखांचे स्थान म्हटले गेले आहे—**'दुःखालयम्'**. याचे तात्पर्य असे आहे की, जो मनुष्य सांसारिक वस्तू, व्यक्ती आणि क्रिया यापासून सुख प्राप्त करतो, त्याच्यासाठी तर संसार भयंकर दुःख देणारा आहे. परंतु जो वस्तू आणि क्रियेने व्यक्तींची सेवा करतो त्याच्यासाठी संसार परमात्म्याचे स्वरूप आहे. सुखाची आशा, कामना आणि भोग महान् दुःखाला कारण आहेत. सुख भोगणारा दुःखापासून कधी वाचूच शकत नाही—हा अकाट्य नियम आहे. म्हणून वस्तू, व्यक्ती आणि क्रिया यांच्यापासून सुख घेऊन नये. ज्या क्षणी सुख बुद्धीचा त्याग होईल त्याच क्षणी परमात्मप्राप्ती होईल—**'त्यागाच्छान्तिरनन्तरम्'** (गीता १२। १२).

जीव त्या समग्र परमात्म्याचा अंश आहे, ज्याच्या रोमा-रोमात कोट्यवधी ब्रह्मांड आहेत! परंतु जीव फसला अपरा प्रकृतीच्या तुच्छाती तुच्छ अंश असलेल्या एका शरीरात! म्हणून जेथे केवळ आनंदच आनंद आहे तेथे जीव केवळ दुःखच दुःख प्राप्त करीत आहे! जसे—गायीच्या स्तनात जेथे केवळ दूधच दूध आहे तेथे राहून गोचिड केवळ रक्तच रक्त प्राशन करतो! गोस्वामी तुलसीदासजी महाराज म्हणतात—

**आनँद-सिंधु-मध्य तव बासा। बिनु जाने कस मरसि पियासा॥**

(विनय पत्रिका १३६। २)

## आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन।
## मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते॥ १६॥

**अर्जुन** = हे अर्जुन!
**आब्रह्मभुवनात्** = ब्रह्मलोकापर्यंत
**लोकाः** = सर्वच लोक
**पुनरावर्तिनः** = पुनरावर्ती स्वभावाचे आहेत अर्थात् तेथे गेल्यावर पुन्हा परतून संसारात यावे लागते.
**तु** = परंतु
**कौन्तेय** = हे कौन्तेय!
**माम्** = माझी
**उपेत्य** = प्राप्ती झाल्यावर
**पुनर्जन्म** = पुनर्जन्म
**न, विद्यते** = होत नाही.

*व्याख्या*—***आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन**—हे अर्जुन! ब्रह्मलोकासह सर्वच लोक पुनरावर्ती आहेत, अर्थात् ब्रह्मलोक आणि त्याच्या खालचे जितके लोक (सुखभोगभूमी) आहेत, त्यात राहणाऱ्या सर्व प्राण्यांना त्या त्या लोकासाठी मिळवलेले पुण्य समाप्त होताच पुन्हा परत यावे लागते.

* ''आब्रह्मभुवनात्'' पदात जो ''आ'' शब्द आला आहे त्याचे दोन अर्थ होतात (१) अभिविधी—जसे ब्रह्मलोकापासून सर्वच लोक अर्थात् ब्रह्मलोक तसेच त्या खालील सर्व लोक (२) मर्यादा—जसे ब्रह्मलोकाला सोडून खालील सर्व लोक अर्थात् ब्रह्मलोकाच्या खालील सर्व लोक. येथे ''आ'' शब्द ''अभिविधी'' अर्थाने आला आहे.